प्रकाशक :

रा. ज. देशमुख

देशमुख आणि कंपनी

१९१ शनवार पुणे २



२ मुखपृष्ठावरील चित्र दीनानाथ दलाल यांचे आहे.




१९४७

मुद्रक :

व्यं. रा. शिंगरे

हिंदुराष्ट्र-मुद्रणालय,

१४०८ कसबा, पुणे

भांडवलावर मी माझी प्रस्तावना एखाद्या युद्ध कथेइतकी रोमहर्षक करूं शकलों असतों. पण—

सपाट भूप्रदेशांत ज्वालामुखीचा स्फोट कुठून होणार ?

माझीं हीं भाषणं न होण्याचीं कारणें अगदींच अळणी आहेत !

१९३९ सालीं मी उज्जैनीच्या संमेलनाचें निमंत्रण स्वीकारलें. मुंबईच्या मराठी ग्रंथसंग्रहालयाचा वार्षिकोत्सव त्याचवेळीं माझ्या अध्यक्षतेखालीं व्हायचा होता. तो समारंभ आटपून पुढें उज्जेनीला जायचं असं मी मनांत ठरविलं होतं. पण माणसाचे सगळे संकल्प जर सिद्धीला जाऊं लागले तर या जगांत ज्योतिषाला कोण विचारील ? माझें मुंबईचें काम संपतें न संपतें तोंच मला इन्फ्लुएन्झानें गांठलें. प्रवासाच्या बाबतींत डॉक्टरनीं माझ्यावर मनाई हुकूम बजावला आणि मला उज्जैनीच्या मंडळीची नाइलाजानें निराशा करावी लागली. भाषण लिहून संपविलं आहे असं मी उज्जैनीला आगाऊच कळवून ठेवलं होतं. ती शुद्ध लोणकढी थाप असावी असं तिथल्या कांहीं कार्यकर्त्यांच्या मनांत आलं असण्याचा संभव आहे. या संग्रहांत छापलेल्या भाषणावरुन त्यांचा तो गैरसमज दूर होईल अशी मी आशा करतो. तसं पाहिलं तर हें १९३९ चं भाषण 'सहा भाषणांतच' समाविष्ट व्हायला हवं होतं पण कांहीं केल्या त्यावेळीं मला त्याचं हस्तलिखीत मिळेना ! माझ्या एका स्नेह्यांनीं ते वाचायला नेलं होतं. आणि आपण तें दुसऱ्याला वाचायला दिलं आहे याचा मला पूर्ण विसर पडला होता. ! त्यामुळें साऱ्या घराचं संशोधनच नव्हे तर अगदीं उत्खनन करूनही त्यावेळीं मला स्वतःवर चडफडण्याखेरीज दुसरं कांहीं करतां आलं नाहीं.

मिरजेच्या संमेलनाच्यावेळीं माझी प्रकृती चांगली धडधाकट होती. लिहिलेल्या अध्यक्षीय भाषणांपेक्षांहि आपलं समारोपाचं समयस्फूर्ति भाषण अधिक चांगलं होईल असें मी स्वतःच्या प्रकृतीकडे पाहून मनांतल्या मनांत मांडे खात होतों. पण लौकरच त्या मांड्यांच्या कोंडा झाला ! मिरजेचं संमेलन अकस्मात रहित झालं नवऱ्या मुलानं बाशिंग बांधून घोड्यावर बसयाच्या पवित्र्यांत उभं राहावं ना ! त्या प्रमाणं मिरजेच्या कार्यकर्त्यांच्या आग्रहामुळं मी भाषण संपवून संमेलनाकरितां सिद्ध होऊन

राहिलों पण एके दिवशीं मला एकदम असें कळलें कीं हें लग्न ठरविणाऱ्या माणसांनां कन्यादान करणाचा कायदेशीर हक्क नसल्यामुळें ज्या घोड्याची वाट पाहात मी उभा राहिलों होतों तो कांहीं आपल्या तबेल्याबाहेर पडूं शकत नाहीं !

तें झालं असं !

मिरजेच्या कांहीं पत्रकारांनीं ' दक्षिणी संस्थान पत्रकार-संमेलन ' भरवायचें ठरवून त्याप्रमाणें कामाला सुरवात केली. या संकल्पित संमेलनाचे चिटणीस श्री. आग्रवाल यांनीं आचार्य जावडेकरांना भेटून त्यांचे हस्तें संमेलनाचें उद्‌घाटन करायचें ठरविलें, माझ्याकडे येऊन अध्यक्षपदासाठीं माझी संमति घेतली आणि संमेलनाच्या तारखा निश्चित करून त्याप्रमाणें पत्रकेंही काढलीं. हें सर्व होत असतांना या संमेलनाला मराठी पत्रकार संघाच्या अध्यक्षांची परवानगी हवी ही कल्पना कार्यकर्त्यांपैकीं कुणांलाच सुचली नाहीं. पुढें हें लक्षांत आल्यावर त्यांनीं त्या दिशेनें प्रयत्न सुरू केले. पत्रकारसंघाच्या घटनेप्रमाणें दक्षिणी संस्थानें हा एक सलग विभाग नसल्यामुळें त्यांनीं या संमेलनाला संमती देतां येत नाहीं असें कळविलें. घटनेप्रमाणें, मिरज, जमखंडी वगैरे ठिकाणच्या पत्रकारांचा जो विभाग आहे त्यानें हवें तर आपलें संमेलन भरवावें अशी सूचना त्यांनीं केली, संगमाला जशा कमींत कमी दोन नद्या लागतात, तशीं संमेलनालाही नाहीं म्हटलें तरी चार निरनिराळ्या ठिकाणचीं माणसें विचार विनिमयाकरतां यावीं लागतात. नाहींतर संमेलन म्हणजे गांवांतल्या चार लोकांची चहा चिवड्याची बैठक व्हायची ! असले नामधारी संमेलन भरण्यपेक्षां तें न भरणें बरें असें मिरजेच्या पत्रकारांनीं मनाशीं ठरविलें आणि माझें समारोपाचें भाषण मला मनांतल्या मनांतच करावें लागलें ! अध्यक्षीय भाषण लिहून तयार होतें म्हणून तें या संग्रहांत समाविष्ट करतां येत आहे. नाहींतर—

नाहींतर काय होतें याचाही अनुभव माझ्यापाशीं आहे. जमखिंडीला १९४० सालीं भरलेल्या दुसऱ्या दक्षिण महाराष्ट्र-साहित्य संमेलनाचा मी अध्यक्ष होतों. वास्तविक तें भाषण या संग्रहांत असायला हवें होतें ! पण—

आधीं भाषण लिहून काढलें कीं तें बोलणाराला न कळत बंधनकारक

होतें अशी माझी कल्पना असल्यामुळें त्या वेळीं मी एक नवा प्रयोग करून पहायचें ठरविलें. अध्यक्षीय भाषण आधीं लिहून न काढतां मी तें करावें, भाषणें टिपून घेण्यांत कुशल असलेल्या एखाद्या सुप्रसिद्ध वार्ताहराला संमेलनाला मुद्दाम बोलावून त्याच्याकडे तें अक्षरशः उतरून घेण्याची कामगिरी सोंपवावी आणि मग त्यानें टिपून घेतलेल्या मजकुरावर जरूर ते संस्कार करून तें पुढें प्रसिद्ध करावें असा त्यावेळीं माझा बेत होता. जमखिंडीच्या चालकांनीं या बाबतींत पूर्ण सहकार्य केल्यामुळें तो यशस्वी होणार अशा आनंदांत मी होतों. मी भाषणाला उभा राहिलों तेव्हां मोठमोठ्या सभांचे अहवाल घेण्याच्या कामीं गाजलेले एक गृहस्थ माझ्यापुढें फाउंटनपेन सरसावून बसलेले मला दिसले. दीड तासानें भाषण आटपून मी खालीं बसलों. संमेलनाच्या गर्दींतून बिऱ्हाडीं परत आल्यावर भाषणाची चौकशी केली तेव्हा त्या गृहस्थांनीं प्रथम दहाबारा मिनिटें तें अक्षरशः टिपून घेण्याचा निकराचा प्रयत्न केला, पण माझा वेग जसजसा वाढत गेला तसतसा माझा पाठलाग करणें अशक्य आहे असा ग्रह होऊन त्यांनीं तो नाद सोडून दिला आणि नेहमींप्रमाणें सारांशरूपानें सारें व्याख्यान घेतलें असें कळलें. लग्नांतच नव्हे तर भाषणांतही घाई केली कीं मागाहून पस्तावत बसण्याची पाळी येते हा धडा मी त्या संमेलनापासून शिकलों ! अजून तें माझें भाषण लिहून झालेलें नाहीं !

## २

हा अनुभव लक्षांत असल्यामुळें लिहिलेले लांबलचक भाषण पांचपांच हजार लोकांपुढें वाचून दाखविणें म्हणजे प्रेक्षकांना खुर्च्यांना बांधून घालण्याची शिक्षा देण्यासारखें आहे अशी मनाची खात्री झाली असूनही मी सोलापूरचें भाषण आधीं लिहून काढलें. मात्र या बाबतींत एक गोष्ट मी मनांत पक्की ठरविली होती. कांहीं झालें तरी भाषण वाचून दाखवून सभेला शाळेंतल्या वाचनाच्या वर्गाचें स्वरूप आणायचें नाहीं. जाड भिंगांचा चष्मा, लहरी दूरध्वनिक्षेपक, प्रेक्षकाच्या जांभया, त्यांच्या हातांतल्या छापील प्रतींचीं मधूनमधून फडफडणारीं पानें आणि आपलाच डरकाळ्या फोडणारा आवाज कानांवर पुनः पुनः आदळूं लागल्यामुळें उत्पन्न होणारें मनाचें

सूक्ष्म अस्वास्थ्य इतक्या शत्रूंशीं झुंज देण्याचें सामर्थ्य आपल्या अंगांत नाहीं हें मी ओळखून होतों. मनुष्य वाचून न दाखवितां बोलूं लागला म्हणजे साहजिकच तो स्वतः त्यांत रंगून जातो, चष्मा पुनःपुन्हां नीट करण्याची किंवा भाषण मागेंपुढें धरण्याची उठाठेव त्याला करावी लागत नाहीं आणि छापलेला मजकूर तो बरोबर वाचतोय किंवा नाहीं हें पाहण्यापेक्षां भाषणाच्या ओघांत तो पुढें काय बोलणार आहे या कुतूहलानें श्रोत्यांचें चित्त वेधल्यामुळें यांत्रिक वाचनाच्या वेळीं त्यांचे जे अनेक अंगविक्षेप, मूक अभिनय व जनांतिक संभाषणें सुरू असतात तीं आपोआपच बंद पडतात !

भाषण वाचण्याऐवजी केल्यामुळें सोलापूरला माझा हा हेतू साध्य झाला असें मला वाटतें. कुठलेंही व्याख्यान संपतांच मुद्रेवर कृत्रिम हास्य आणून 'छान, छान ! ' It was a treat ! असें म्हणत वक्त्याशी प्रतिष्ठित सभाजनांनीं हस्तांदोलन करण्याचा जो कृत्रिम उपचार आपल्याकडे रूढ होऊं पाहत आहे त्याच्या आधारानें मी हें विधान करीत नाहीं. हात आणि हृदय यांत फार अंतर असतें हें नाटकांतल्या नायिकेनें खलपुरुषाला उद्देशून बोलायचें वाक्य हल्लीं व्यवहारांतही प्रत्येकाच्या अनुभवाला येऊं लागलें आहे त्यामुळें सभामंडपांत माझ्या भाषणाविषयीं मी जे अनुकूल उद्गार ऐकले त्यांनीं मी मुळींच हुरळून गेलों नाहीं. पण माझ्या खोलींत मी विश्रांति करतां येऊन पांचदहा मिनिटें झालीं असतील नसतील तोंच विठ्ठलराव घाटे माझ्याकडे आले व म्हणाले 'तुमच्या भाषणाला पांचांपैकीं साडेचार मार्क दिले मीं ! इतके मार्क सहसा माझ्या हातून पडत नाहींत !'

विठ्ठलरावांचे हे उद्गार ऐकून मला बरें वाटलें. भाषण वाचून दाखविण्याचा परंपरागत संकेत मी पाळला असता तर त्यांनीं मला दीडदोन मार्कसुद्धां दिले नसते. कदाचित् खाडकन् नापासही केलें असतें ! मात्र श्रोत्यांच्या दृष्टीनें त्या दिवशींचें माझें भाषण ठीक झालें असलें तरी विषय प्रतिपादनाच्या दृष्टीने तें अपुरें राहिलें अशी रुखरुख त्या समाधानाच्या क्षणींसुद्धां मला जाणवल्यावांचून राहिली नाहीं. माझ्या बोलण्याच्या पद्धतींत हा एक मोठा दोषच आहे. भाषण आधीं लिहून काढलेलें असलें तरी बोलायला उभें राहिल्यावर मी त्याच्या कुठल्यातरी भागांत रंगून जातो, न

लिहिलेल्या गोष्टी मला पटपट सुचूं लागतात आणि मग शेवटीं नमनालाच घडाभर तेल जाळणाऱ्या हरिदासाचें आख्यान घाईघाईनें आवरावें तसा प्रसंग माझ्यावर येतो. सोलापूरच्या भाषणाचा उत्तरार्ध माझ्या दृष्टीनें पूर्वार्धापेक्षां महत्त्वाचा होता. पण प्रत्यक्ष बोलण्यांत मी पूर्वार्धच अधिक रंगविला. शाळकरी मुलानें रस्त्यावरल्या खेळांत रंगून जाऊन शाळेला उशीर करावा ना ? बोलतांना तस्सें होतें माझें ! बोलायला उभें राहिल्या-वर नवीन उदाहरणें आठवतात, नव्या नव्या कल्पना डोळ्यांपुढें नाचूं लागतात, श्रोत्यांची कळी उमलत आहे असें वाटलें तर त्याचाही भाषणा-वर परिणाम होतो आणि अशा गोष्टीमुळें व्याख्यानाला जरी अनपेक्षित रंगत आली तरी त्याचें स्वरूप मूळ संकल्पाइतकें रेखीव राहूं शकत नाहीं. गडकऱ्यांच्या नाटकांचे पुढचे अंक घाईघाईनें थोडक्यांत रंगभूमीवर करतात ना ? तशी माझ्या भाषणाची स्थिति होते.

लिहिलेल्या भाषणांत नसलेलें असें काय काय त्या दिवशीं मी बोललों हें आज मला सांगतां येणार नाहीं. पण प्रमुख विद्यमान ललित लेखकांचे दोषदिग्दर्शन करतांना गिब्रानची 'महासागर' ही रूपककथा चटकन् माझ्या डोळ्यांपुढें उभी राहिल्यामुळें भाषणाच्या त्या भागाची जी खुलावट झाली ती मी अजून विसरलों नाहीं.

गिब्रानच्या या गोष्टींत एक कवि आपल्या आत्म्यासह समुद्र तीरावर जातो. तिथें त्याला नाना तऱ्हांच्या उद्योगांत मग्न झालेले लोक दिसतात. त्यांची आपल्या विविध साहित्यिकांशीं मी तुलना करीत गेलों. त्या गोष्टीं-तला पहिला मनुष्य एका मिठाच्या पिशवींतून थोडें थोडें मीठ समुद्रांत टाकीत बसलेला असतो. जुन्याचा केवळ भावनात्मक दृष्टीनें पुरस्कार करून नव्याकडे अश्रद्ध निराशेनें पाहणाऱ्या य. गो. जोशांचें चित्र वाटलें तें मला. लगेच मी अत्रे व फडके यांच्याकडे वळलों. त्यांच्या वाङ्मयांत जो उथळ सुखवाद आहे त्याचें चित्र गिब्रानच्या शब्दांत मी असें रेखा-टलें, --'तिथें पांढऱ्या शुभ्र खडकावर बसलेला एक मनुष्य आम्हांला दिसला. त्याच्या हातांत एक रत्नजडित पेटी होती. त्या पेटींतून प्रत्येक वेळीं चिमूटभर साखर काढून तो ती समुद्रांत टाकीत होता.' या गोष्टींतला

तिसरा मनुष्य मोठ्या नाजुक हातानें वाळवंटांत मरून पडलेलें मासे उचलून ते परत समुद्रांत नेऊन सोडीत असतो. त्याचें वर्णन करून मी म्हणालों; ' हे तुमचे भूतदयावादी खांडेकर. आजच्या विषम समाजरचनेच्या पायांत माणुसकीचा पदोपदीं बळी दिला जात आहे म्हणून ते आपल्या प्रत्येक कादंबरींत अश्रु गाळीत आहेत. पण नुसत्या अश्रुधारांनीं या जगांतला एक तरी अन्याय दूर झाला आहे कां ? क्रांतीला रक्ताचा नैवेद्य लागतो, अश्रूंचा नाहीं हें त्यांना अजून उमजत नाहीं ! वाळूंत काढलेली आपल्या छायेची आकृति लाटा पुसून टाकीत आहेत हें ठाऊक असूनही ती पुन्हां पुन्हां रेखाटणाऱ्या मनुष्याशीं मी वामनराव जोशांची तुलना केली. मानवी सौजन्यावरली त्यांची अढळ श्रद्धा त्यावेळीं माझ्या डोळ्यांपुढें उभी होती. सानेगुरुजी आजच्या इतके सहा वर्षांपूर्वी लोकप्रिय नव्हते, पण त्यांच्या वाङ्मयांतले स्वप्नाळु ध्येयवादित्व दर्शित करतांना 'समुद्रावरला फेस गोळा करून तो कमंडलूंत भरण्याचा प्रयत्न करणाऱ्या' माणसाचें चित्र मी रेखाटलें, वरेरकर--माडखोलकरांची वास्तवता ही 'समुद्राकडे पाठ फिरवून कानाला लावलेल्या शिंपल्यांतून सागरगर्जना ऐकणाऱ्या व्यक्तीसारखी आहे' असें सांगून मी त्यावेळीं हें वर्णन पुरें केलें होतें.

या वर्णनानें माझ्या लिहिलेल्या भाषणांतल्या या भागांत नसलेला चटकदारपणा सभामंडपांत निर्माण केला पण मौजेची गोष्ट ही कीं एकाही वृत्तपत्रानें त्या भाषणांतल्या असल्या कुठल्याही उत्स्फूर्त नावीन्याचा एका शब्दानेंसुद्धां उल्लेख केला नाहीं. मला उचलून धरणारे, माझ्यावर तुटून पडणारे, खांडेकरांचें भाषण प्रतिगामी झालें म्हणून आरोळ्या ठोकणारे आणि धुळवडीशिवाय जशी होळीला पूर्णता येत नाहीं तसें पुढें महिना दोन महिने खऱ्याखोट्या टीकेनें वर्तमानपत्रांचे अंक भरले नाहीत तर संमेलन साजरेंच होत नाहीं असें मानणारे अनेक साहित्यिक व पत्रपंडित संमेलनाला हजर होते. वाचकांना जेवढें पंचगव्य द्यायला हवें होतें तेवढें त्यांनीं—प्रसंगीं त्यांचें नाक दाबून—पुढें कांहीं दिवस त्यांना पाजलें. पण हें सारें धर्मकृत्य यथाशास्त्र करीत असतांना मी केलेलें भाषण लिहिलेल्या भाषणाहून थोडें फार निराळें होतें याची दखल जशी कुणी घेतली नाहीं, तसें चार दोन सन्मान्य अपवाद वगळले तर माझ्या भाषणाच्या तात्विक बैठकीकडेही कुणी

लक्ष दिलें नाहीं. संमेलनाला हजर असलेल्या साहित्यिकांनीं व पत्रपंडितांनीं भाषण ऐकल्यावर तें वाचण्यांत स्वारस्य नाहीं अशा समजुतीनें तें बहुधा वाचलें नसावें ! आणि जे हजर नव्हते त्यांच्यापुढें अप्रस्तुत ऐकीव बातम्यांना तिखटमीठ लावून आपलें लिखाण चुरचुरीत करण्याचें महत्कार्य असल्यामुळें असलें रुक्ष वाचन करायला त्यांना वेळ मिळाला नसावा ! 'शृंगार व हास्य हे मुख्यतः व्यक्तिनिष्ठ रस आहेत. पण करुण, वीर व वत्सल हे या दोन्ही-हून अधिक व्यापक स्वरुपाचे असे रस आहेत. या तीन रसांचा व्यक्ति-जीवनाशीं निकटचा संबंध असला तरी सामाजिक रस या दृष्टीनें आज त्यांचें महत्त्व अधिक आहे'—'आमच्यांत आज प्रतिभेची उणीव नाहीं; जीवनाच्या व्यापक जाणिवेची उणीव आहे. कलोपासनेला लागणाऱ्या उत्कट प्रामाणिक-पणाची उणिव आहे', 'विचारशील व्यक्तित्वाशिवाय ललितलेखक द्रष्टा होऊं शकत नाहीं', 'कलेचा उगम संघर्षाइतकाच संगमांत आणि संग्रामात आहे', 'स्वतःला बंडखोर म्हणविणाऱ्या सर्व मराठी ललितलेखकांच्या अंतःकरणांत डोकावून पहावें, प्रत्येकजण अगदीं सामान्य सुधारक आहे असें आढळून येईल', 'व्यक्तिजीवनाचें सौंदर्य आतां व्यक्तीवर अवलंबून नाहीं. तें समाज-जीवनाच्या सौंदर्यावर आणि स्वातंत्र्यावर अवलंबून आहे', 'मनुष्य परि स्थितीचा गुलाम नाहीं. तो आपल्या मनाचा गुलाम आहे. मनाच्या शृंखला वाङमयच तोडूं शकते.' अशांसारखीं अनेक विधानें माझ्या भाषणांत आहेत. त्यांतलीं कांहीं एकांगी असतील. पण संमेलनाच्या वेळीं अथवा त्यानंतर वृत्तपत्रांतल्या राक्षस पार्ट्यांनीं उडविलेल्या राळेंत आणि स्वतःला शिकारी समजून वेळींअवेळीं आपल्या लेखणीचे बायबार काढीत सुटणाऱ्या संपादकांनीं उठविलेल्या रानांत या विधानावरच्या टीकेचें दर्शन मला कुठेंच झालें नाहीं.

मात्र या हुल्लडबाजींतही तीनचार अधिकारी व्यक्तींच्या मार्मिक टीकेचा लाभ मला झाला. आचार्य जावडेकर हे त्यांत अग्रेसर होत. गांधीवाद व मराठी वाङमय या विषयींचीं माझीं विधानें मान्य नसल्यामुळें त्यांनीं ज्याप्रमाणें त्यांची कठोर चिकित्सा केली त्याप्रमाणें 'खांडेकरांनीं आजच्या मराठी ललितवाङ्मयाचें आत्मनिरीक्षणात्मक परीक्षण करून त्यांतील उणीवा लोकांपुढें मांडल्या आहेत,' 'आज शृंगार आणि हास्य यांच्यापेक्षां करुण, वीर व

वत्सल रसांची अधिक आवश्यता आहे. हें खांडेकर यांचें मत माननीय आहे.' अशा अर्थाचे उद्गारही त्यांनीं काढले ! माझें सर्व भाषण हें एक प्रकारचें आत्मपरिक्षण होतें हें फक्त त्यांनींच ओळखलें.

३

इतर अनेकांनीं आपल्या सोईसाठीं या भाषणाचें हवे तसे लचके तोडले आणि संदर्भविरहित वाक्यें घेऊन माझ्या पदरीं शक्य तितका मूर्खपणा बांधण्याचा प्रयत्न केला. खेळाडूपणाची आणि सत्यवक्तेपणाची ब्रिरुदें मिरविणाऱ्यांनीं माझ्या भाषणावर टीका करतांना माझ्या अंगावरील डागांचा उल्लेख केला इतकेंच नव्हें तर हंसकंपनीच्या नटयाबरोबर मी मोटारींतून फिरत आहे असेंही सूचकपणानें वाचकांच्या गळीं उतरविण्याचा प्रयत्न केला ! १९३८--३९ सालीं हंसकंपनीच्या ज्या गाडींतून मी स्टूडियोत जात असें त्याच गाडींत कित्येकदां कंपनीच्या त्या त्या वेळच्या चित्रांत काम करणारी एकादी नटीही असे. राजाराम पुरींतल्या माझ्या घरापासून मैल-सव्वा मैल अंतरावर असलेल्या स्टुडियोपर्यंत आमचा हा सहप्रवास कधीं कधीं होई. पण संमेलनांत घडलेल्या एका प्रसंगाच्या निमित्तानें या साध्या गोष्टीचा सूचक रीतीनें उल्लेख करणारांनीं आपल्या पायाखालीं जन्मभर काय जळत आलें आहे हें जसें पाहिलें नाहीं तसें संमेलनांत खरोखरच काय घडलें हें जाणून घेण्याइतका प्रामाणिकपणाही दाखविला नाहीं. संमेलनाच्याच अहवालांतून त्या प्रसंगाची हकीगत खालीं देतों म्हणजे अध्यक्षावर वैयक्तिक टीका करण्याइतका त्या प्रकरणाशीं माझा संबंध होता कीं नाहीं हें कुणालाही सहज कळून येईल. सोलापूर संमेलनाच्या अहवालांत पृष्ठ २२ वर खालील मजकूर आहे—

'दुसरा दिवस उजाडला आणि सकाळींच लोकशक्तीच्या अंकांत 'नटीस व्यासपीठावर बसविलें' अशा अर्थाचा निराधार व खोटा मजकूर प्रसिद्ध झालेला लोकांच्या पाहण्यांत आला. अधिवेशन सुरू होण्याच्या आधींच संमेलनाचे स्वागताध्यक्ष शेट रतनचंद हिराचंद दोशी यांनीं 'लोकशक्ती'चे वार्ताहर श्री. बापट यांना याबद्दल खुलासा विचारला. त्यांनीं 'या बाबतींत मी जबाबदार नाहीं' अशा अर्थाचें उत्तर दिलें. श्रोतवृंदानें 'अधिक

खुलासा द्या' अशी जोराची मागणी केली. तेव्हां 'लोकशक्ती'चे श्री. बापट हे व्यासपीठावर आले आणि म्हणाले कीं 'बातमी मी टेलिफोनवर सांगितली. ती लिहून घेतांना संपादकांचा कांहींतरी गैरसमज झाला असावा असें वाटते. मी ती बातमीं निराळ्या स्वरूपांत सांगितली होती.' 'माझं या खुलाशानं समाधान होत नाहीं. आपणाकडून अधिक समाधानकारक खुलासा न झाल्यास नाइलाजानें आपणांस बाहेर जाण्यास सांगावं लागेल' अशीं स्वागताध्यक्षांनीं श्री. बापट यांना सूचना केली. श्रोतृवर्गांत 'लोकशक्तीच्या बातमीदारांना बाहेर काढा' अशी ओरड सुरू झाली, यानंतर 'या प्रकरणाबद्दल मी जाहीर माफी मागतो' असें श्री. बापट यांनीं म्हटलें व या माफीमुळें हें अनपेक्षित रीतीनें उठलेलें वादळ ताबडतोब शांत झालें. व्यासपीठावर कोणास बसवावयाचें याबद्दल कार्यकारी मंडळानें पहिल्यापासून दक्षता घेऊनही वरील अप्रिय टीकाप्रकार घडून यावा याबद्दल खरोखरच विषाद वाटतो.'

यावेळीं मी अध्यक्षीय खुर्चीत बसलों होतों हा काय तो या प्रकरणांतला माझा अपराध !

आमच्यांतील टीकाकारांना—मग ते पत्रकार असोत अथवा साहित्यिक असोत—सत्याची पूजा मनापासून नको असते. कारण सत्य हें पुष्कळदा कल्पनेपेक्षां अधिक साधें, सौम्य आणि सोज्वळ असतें. सत्याची प्रवृत्ति वादळ उठविण्यापेक्षां तें शांत करण्याकडे आहे. पण पदोपदीं प्रक्षोभावर जगायची संवय झालेल्यांना सत्याला आवडणारी ही गंभीर शांतता कशी रुचावी ! आत्मवंचक अहंकाराच्या आहारीं गेलेल्यांच्या अंगीं उघडया डोळयांनीं कठोर आत्मपरीक्षण करण्याइतकें धैर्य कुठून यावें ? येनकेन प्रकारेंण दुसऱ्याला मूर्ख ठरविण्यावरच स्वतःचा शहाणपणा अवलंबून आहे या भ्रामक समजुतीनें अकांडतांडव करीत सुटणारे कुठल्याही गोष्टीची दुसरी बाजू पाहण्याचा समंजसपणा कसा दाखवितील ? 'सोलापूरच्या संमेलनांत फॅसिझमविरुद्ध ठराव नापास झाला ना ? ठीक आहे. खांडेकराला ठोकायला ही चांगली संधि आहे !' हा ज्यांचा दृष्टिकोन त्यांनीं ठरावांत फॅसिझमबरोबर साम्राज्यशाहीचा अंतर्भाव करा. ही लोकांची मागणी ठराव मांडणा-

यांनीं मान्य न केल्यामुळें तो पडला हें लक्षांत घेण्याची जरुरी काय ? सोला-पूर संमेलनापूर्वी वर्षसहा महिने 'शंखं दध्मौ पृथक् पृथक् ' हें वर्णन पूर्ण-पणें शोभेल अशा रीतीनें अत्रे आणि फडके यांनीं एकमेकांचीं अंडीपिल्लीं बाहेर काढण्याचा जो गलिच्छ सपाटा चालविला होता त्याच्यामुळें कृष्ण-राव मराठ्यांचा सनातन ठराव तिथें पास झाला ! अध्यक्षांच्या पुरोगामि-त्वावर किंवा प्रतिगामित्वावर त्या ठरावाचें यशापयश मुळींच अवलंबून नव्हतें ! पण त्या ठरावामुळें ज्यांच्या अंगाला खाजकुल्या लागल्या त्यांनीं व त्यांच्या पुठ्यांतल्या पंडितमान्यांनीं यासंबंधीं जे तारे तोडले त्यांचा सत्याशीं काय किंवा साहित्याशीं काय काडीइतका संबंध असेल तर शपथ !



असल्या कांहीं कटु गोष्टींप्रमाणें त्या संमेलनाच्या वेळच्या अनेक लहान-सहान गोड आठवणीही मला अजून आठवत आहेत. आम्ही कोल्हापूरची वीस पंचवीस मंडळी बार्शी लाइट रेल्वेनें संमेलनाला गेलों. श्रावणांत मुली मंगळागौर जागवितात ना ? तसा आम्ही साहित्यप्रेमी लोकांनीं आमचा डबा त्या रात्रीं जागवला ! डब्यांतल्या इतर उतारूंनीं त्या रात्रीं आम्हांला मनांतल्या मनांत काय म्हटलें असेल तें देव जाणे ! मिरज ते कुर्डुवाडी यांच्या दरम्यान कुठल्या तरी एकाच स्टेशनावर चांगला चहा मिळण्याची शक्यता होती ! त्या दिवशीं गार्डानें मुद्दाम आमच्याकरितां तिथें गाडी अधिक वेळ थांबवून आपलें साहित्यप्रेम व्यक्त केलें.

त्या गार्डासारखीच दुसरी एक व्यक्ति माझ्या डोळ्यांपुढें आतां उभी राहत आहे. ती म्हणजे सोलापूरचे कै. बसलिंगप्पा शेटे. बसलिंगप्पा संमे-लनाच्या भोजन समितीचे अध्यक्ष होते. पाहुण्यांच्या सरबराईत कुठलेंही वैगुण्य राहूं नये म्हणून ते घेत असलेली दक्षता पाहून त्यावेळीं मला मोठें नवल वाटलें. एखाद्या सेनापतीप्रमाणें त्यांचा सारा कारभार मोठ्या शिस्तींत चालत असे. त्यांची ती भावपूर्ण आणि निरक्षेप साहित्यसेवा माझ्या स्मर-णांतून कधींही जाणार नाहीं.

५

पण अशाआठवणींमुळेंच मी इतका वेळ मनांत दडपून ठेवलेले अनेक साहित्यविषयक प्रश्न आतां उसळून वर येत आहेत. तें प्रश्न हे——साहित्यावर निरपेक्ष प्रेम करणारे लोक दिवसेदिवस वाढत आहेत. त्यांच्या या वाढत्या प्रेमाला पात्र होण्याइतके आम्ही साहित्यिक जीवनाशीं आणि आपल्या वाङ्मयाशीं प्रामाणिक राहिलों आहोत काय ? साहित्य ही मानवतेची मंगल पूजा आहे या श्रद्धेनें आम्ही वाङ्मय निर्माण करीत आहों काय ? प्रतिभा हा व्यक्तित्वाचा फुलोरा आहे हें ध्यानांत आणून आपला आत्मा अनुभूतीनें संपन्न आणि तपस्येनें सतेज कसा होईल याचा मार्ग शोधून काढून तो आपण चोखाळीत आहों काय ? सौंदर्याचा नवा नवा साक्षात्कार व्हायला कलावंताचें मन ज्या उच्च संवेदनक्षम पातळीवर अहर्निश असावें लागतें ती साध्य होण्याकरितां आवश्यक असलेली अंतर्मुखता संपादन करण्याचें आपण कांहीं अखंड प्रयत्न करीत आहों काय ?'

माझें सोलापूरचें भाषणही सहा वर्षांपूर्वीच्या असल्या प्रश्नांचीं उत्तरं देण्याच्या धडपडींतून निर्माण झालें होतें. अजूनही तेच प्रश्न मला बेचैन करून सोडीत आहेत.

याचा अर्थ गेल्या सहा वर्षांत मराठींत चांगलं वाङ्मय निर्माण झालं नाहीं असा मात्र मुळींच नाहीं. मरठींत वर्षाकांठीं फक्त चार दोन चांगलीं पुस्तकं निर्माण होतात असें कुणीतरी पंडितांनीं परवां उद्‌गार काढले म्हणे. याच्या उलट आपलं वाङ्मय घोडदौडीनें प्रगति करीत आहे, अशा समजुतीनं स्वतःची पाठ थोपटून घेणारे विद्वानहि मी पाहिले आहेत! पहिल्या पद्धतीचे टीकाकार भूतकालापेक्षां वर्तमानकाल नेहमींच वाईट असतो असं मानून चालणाऱ्या चिंतातुर जंतूंच्या कोटींत पडतात. दुसऱ्या वर्गांतले लोक खिशांतल्या लॉटरीच्या तिकिटाच्या आधारावर अत्तराचे दिवे लावूं पाहाणाऱ्या माणसांच्या वर्गांत मोडतात. सत्य म्हणेज दोन अतिशयोक्तिंचा सुवर्णमध्य होय असं कुणीतरी म्हटलें आहे ! त्याची मला यावेळीं आठवण होते. आज महाराष्ट्रांत साहित्याचे अठरा कारखाने मोठ्या जोमानें सुरू आहेत असं कुणीच म्हणणार नाहीं. उलट आज साहित्य क्षेत्रांत

अठराविश्वे दारिद्य आहे असं म्हणून डोळयाला पदर लावणें हेंहि मूर्खपणाचें आहे 'कारागृहाच्या भिंती ','वैष्णव', 'मोळी', 'उन्मेष', 'नवीमूल्यं' ' वाङ्मयतलि वादस्थळें इत्यादि वरच्या दर्जाचीं पुस्तकं अगदीं अलीकडच आपण वाचलीं नाहींत काय ? तरुण कवीतलें शुक्र आणि मंगळ—बोरकर व कुसुमाग्रज—काव्य क्षेत्रांत आज पूर्णतेजानं तळपत आहेत. त्यांच्या जोडी-ला अनेक नवे तारेहि चमकूं लागले आहेत. मराठी लघुकथा काळानुरूप नवं वळण घेत असून कुसुमावती देशपांडे, अरविंद गोखले, पु. भा. भावे, गंगाधर गाडगीळ इत्यादिकांच्या कथांतून वैशिठयपूर्ण अनुभुतींचा रमणीय आविष्कार— होत आहे. वा. ल. कुलकर्णी आणि क्षीरसागर यांच्यासारखे व्यासंगी लेखक टीकेची जुनी चाकोरी सोडून नवा मार्ग चोखाळीत आहेत. साहित्य वृक्षावरला हा सर्व मोहर पाहून ज्याचें अंतःकरण प्रफुल्लित होत नाहीं आणि नव्या वासंतिक वैभवाचीं तीं प्रसाद चिन्हें आहेत हें ज्याला पटत नाहीं, तो मुलखाचा अरसिक असला पाहिजे असं मला वाटतं !

मात्र माटयांपासून मोकाशीपर्यंतचे जे जुने नवे लेखक आज साहित्य क्षेत्रांत चमकत आहेत, त्यांच्या विशिष्ट गुणांचा चाहता असूनही सौंदर्य, सामर्थ्य व साधुत्व यांची पूजा करणारें माझें मन अजून असंतुष्ट आहे हें मी नाकबूल करूं शकत नाहीं आजच्या साहित्यांतल्या व साहित्य कारांतल्या अनेक उणीवा मला तीव्रतेनें जाणवतात—कधीं कधीं त्या शल्याप्रमाणेंच मनांत सलूं लागतात? आजच्या काळांत साहित्य सेवा ही प्रतिभावंतांची केवळ बौद्धिक क्रीडा होऊं शकत नाहीं, तें त्यांचं पवित्र व्रत झालं पाहिजे असं मला राहून राहून वाटतं ? पण —

एक नुकतीच घडलेली सत्यकथा सांगतो म्हणजे माझ्या असंतोषाचें एक कारण स्पष्ट होईल.

तरुण पिढींतल्या एका व्यासंगी टीकाकारांनीं एका सुप्रसिद्ध वृत्तपत्राकडे आपलें पुस्तक अभिप्रायाकरितां पाठवलं. कांहीं दिवसांनीं त्या वृत्तपत्राच्या कचेरीवरून जाण्याचा योग त्यांना आला. त्या टीकाकारांना वाटलं आपण आंत जावं आणि सदरहू वृत्तपत्राचे विद्वान संपादक आपया पुस्तकासंबंधीं काय म्हणतात याची सहज चौकशी करावी. देशभक्तीचं यज्ञकुंड या

वृत्तपत्राच्या कचेरींत अष्टौप्रहर पेटलेलं असतं असं त्या टीकाकारांनी अनेकदां ऐकलं होतं. म्हणून भीतभीतच त्यांनी त्या पवित्र मंदिरात पाऊल टाकलं आगामी क्रांतीच्या त्या महायज्ञाचे मुख्य ऋत्विज खुर्चीत अस्ताव्यस्त पसरलेले त्यांना दिसले. नमस्कार चमत्कार झाल्यावर दोघांचं संभाषण सुरू झालं !

'काय कुणीकडे आलांत आज ?'

'नाहीं म्हटलं तुमच्याकड'—

'आमच्याकडं काय काम आहे बुवा तुमचं ?'

'माझं एक नवं पुस्तक प्रसिद्ध झालंय'—

'असंस पाठवाना अभिप्रायाला आमच्याकडं असं फर्मास परीक्षण करतों म्हणतां !

'तें पाठवून पुष्कळ दिवस झाले. तेव्हां म्हटलं तुमचं त्याच्याविषयींच मत—'

"माझं मत ? अहो तुमचं पुस्तक प्रसिद्ध झालंय हेंच जिथं मला ठाऊक नाहीं तिथं— अरे राम्या, गोम्या सोम्या —' संपादक महाराज नोकरांमार्फत कुणातरी उपसंपादकाला बोलावून आणतात व त्यांच्याकडे सदरहू पुस्तक आपल्याकडे आलें आहे किंवा काय याची चौकशी करूं लागतात उपसंपादक प्रथम कानावर ठेवतो, पण साहेबांच्या नजरेकडे त्याचें लक्ष जातांच तो आंत जातो व तिथल्या पुस्तकांच्या गठ्ठयांचें संशोधन करून विजयी मुद्रेनं टीकाकाराचा ग्रंथ हातांत घेऊन बाहेर येतो तो ग्रंथ पाहातांच टीकाकाराला जरा बरं वाटतं. तो विनयानं संपादक महाराजांना म्हणतो 'केव्हां वाचून होईल हें आपलं ?म्हणजे त्या बेतानं मी पुन्हां—

—'पुन्हां येण्याची तसदी कशाला घेतां उगीच ? मी आहे आपला फटकळ मनुष्य. म्हणून जरा स्पष्ट बोलतों. क्षमा करा हं. अहो, तुमचीं हीं पुस्तकं वाचायला इथं फुरसद आहे कुणा लेकाला ? तिकडे सारा देश शंख करतोय् नि तुम्ही इकडे टीका खरडत बसलाय् ! तिकडे नौखालींत काय हा हाःकार चाललाय् ! महाराजा, जिनांनी पाकिस्थानाचं केवढं मोठं

कारस्थान रचलयू तें पाहिलंत ना ? महात्मा गांधी एकला चलो रे असें म्हणत बंगालमध्यें पायीं यात्रा करीत आहेत.—पुढल्या अग्रलेखांत वैदिक धर्माच्या पुनरुत्थाना करतां साऱ्या भरतखंडांत परिभ्रमण करणाऱ्या शंकराचार्योशींच त्यांची तुलना करणार आहे मी—.'

संपादकांना मध्येंच धूम्रपान करण्याची लहर येते. आतांपर्यंत धूम्रपाना विरुद्ध असलेल्या टीकाकारांचें त्या बाबतींबद्दलचें मत एकदम बदलतें. आज सिगारेट आपल्या साहाय्याला धांवून आली नसती तर संपादकांचा पुढला सारा अग्रलेख त्यांच्या साग्रसंगीत मल्लिनाथीसह आपल्याला ऐकून घ्यावा लागला असता. हें त्यांना कबूल करावेंच लागतें; सिगारेटचें मनांतल्या मनांत आभार मानून तो बिचारा सुटकेचा निःश्वास सोडतो व हळूच विचारतो, ' मग माझ्या पुस्तकावर तुमच्या वर्तमान पत्रांत अभिप्राय येणें शक्य नाहीं—'

मोठमोठ्यानें हंसत संपादक उत्तरतात, ' अगदीं मास्तर आहांत बुवा तुम्ही ! अहो, कुठलंही पुस्तक न वाचतांच तिच्यावर आम्ही अभिप्राय देवूं शकतों. तें उत्तम अगर भिकार ठरविणं हा आमचा तळहाताचा मळ आहे. असें आ काय वासतां ? एखादें पान उघडायचें, त्यांतलीं चार वाक्यें वाचायचीं नि तेवढ्या आधारावर लेखकाला यथेच्छ ठोकायचं !'

बिचारा टीकाकार हतबुद्ध होऊन त्या पवित्र मंदिरातून बाहेर पडला.

साहित्यक्षेत्रांत श्रेष्ठ मानलीं जाणारीं अनेक माणसें आज अशा प्रकारच्या बेजबाबदार वृत्तीनें वागत आहेत. हे महा-पंडीत वाङ्मयावर लांबलचक व्याख्यानें देतात, वेळीं अवेळीं साहित्याविषयक चर्चा करतात आणि आपलें वाचन अद्यावत् आहे असा नेहमीं आव आणतात, पण त्यांचें हें वाङ्मय प्रेम म्हणजे केवळ स्वतःच्या मोठेपणाचें प्रदर्शन असतें. विद्वत्ता, रसिकता, चिकित्सा, परिश्रम इत्यादिकांना या मिरासदारांच्या मिरवणुकींत—सहसा स्थान असत नाहीं. त्यांचा सारा धंदा जुन्या भांडवलावर चाललेला असतो. काळवेळ पाहून स्वतःची टोपी बदलणें आणि वेळीं अवेळीं आपल्या प्रतिस्पर्ध्यांच्या टोप्या उडविणें या माकड चेष्टांत आमच्या अनेक मोठ्या लेखकांचा इतका वेळ जातो कीं,—

असें कां घडतें ? ही बुद्धिमान माणसें अशी बेजबाबदार कां होतात ?

मला तरी याचें एकच उत्तर सुचतें—अहंकार. हा कलावंतांचा सर्वांत मोठा शत्रु आहे हें आम्ही विसरत चाललों आहों. जनसेवा आणि ईश्वरभाक्ति यांच्याप्रमाणें साहित्योपासना ही सुद्धां एक प्रकारची साधना आहे. याचा विसर पडला कीं इतर धंदेवाईकांप्रमाणें कलावंतही व्यावहारिक मूल्यांनीं आपल्या निर्मितीचें मोजमाप करूं लागतो. पण कलेचीं मूल्यें मूलतः आत्मिक (Spiritual) आहेत. कलावंतालाही दुपारीं भाकरी लागतें हें खरें ! पण खरा कलाकार त्या भाकरी करतां स्वतःच्या आत्म्याशीं कधींहि प्रतारणा करणार नाहीं. आपल्या तत्त्वनिष्ठेपासून तो विचलित झाला कीं लगेच त्याचा अधःपात सुरू होतो. पैसा, प्रतिष्ठा, शरीरसुख इत्यादि मूल्यांची किंमत व्यवहारांत पुष्कळ असेल ! नव्हे, आहे. पण धर्माप्रमाणें कलेच्या क्षेत्रांतही माणसाचा आत्मा—त्याचें विकासशील व्यक्तित्व हीच सर्वांत महत्वाची गोष्ट आहे. कलेचें सौंदर्य हा अभिसारिकेचा शृंगार नाहीं; तो सतीचा शृंगार आहे.

पण नेमकें याच गोष्टीकडे आम्हा साहित्यिकांचें अजूनही दुर्लक्ष होत आहे असें मला वाटतें. स्टीफन स्वाइगच्या 'The world of yesterday' या आत्मचरित्रांत एक साधा प्रसंग आहे. पण मला तो फार महत्वाचा नि मार्गदर्शक वाटतो एके दिवशीं स्वाइग सकाळपासून दुपारपर्यंत आपल्या अभ्यासिकेंत बसून राहिला होता. तो दुपारीं जेवायला खोलींबाहेर आला तेव्हां त्याच्या आनंदी मुद्रेकडे पाहून आज स्वारीच्या हातून मोठें सुंदर लेखन झालें असावें असा त्याच्या पत्नीनें तर्क केला. तिनें त्याला हंसत विचारलें, त्यानेंही हंसतच उत्तर दिलें 'माझ्या एका हस्तलिखितांतल्या एका परिच्छेदाची लांबी कशी कमी करावी या विवंचनेंत मी पुष्कळ दिवस होतों. अगदीं थोडक्यांत पण सुंदर रीतीनें मला तो सर्वभाव व्यक्त व्हायला हवा होता. पहिल्या लेखनांत तें माझ्या मनासारखें साधलें नव्हतें. आज तें छान जमलें !'

आपल्या साहित्याच्या बाह्य सोडा, पण आंतरिक सौंदर्याकडे तरी इतक्या जागरूक दृष्टीनें पाहणारें लेखक आपल्यांत कितीसे आहेत ?

आम्ही बहुतेकांनीं झटपट रंगाऱ्याचीं दुकानें उघडलीं आहेत हें सिद्ध करा-यला बडेबडे टीकाकार हवेत कशाला ? एकाच चित्रांत अनेक महिनें रंगून जाणाऱ्या चित्रकाराची सुक्ष्मसौंदर्य दृष्टि जशीं आमच्यापाशीं नाहीं तशी कलेच्या उपासनेला आवश्यक असणारी सहनशीलताही आमच्या अंगीं नाहीं. एखादी बरीशी कल्पना सुचली रे सुचली (ती बरी असते याचा अर्थ ती नवीन किंवा वैशिष्टयपूर्ण असते असा मुळींच नाहीं ) कीं तात्काळ तिची कथा —नाटक—कादंबरी बनवायचा मोह आम्हांला वेडे करून सोडतो. मग उत्कृष्ट कलाकृति अशी हुकमे हुकूम कधींच तयार होत नाहीं. हें लक्षांत कोण घेतो ? सत्कवि स्वतःला स्फुरलेल्या सुंदर भावगीताचीं पहिलीं तीन चार कडवीं चार घटकांत लिहून जाईल. पण शेवटच्या उरलेल्या एका कडव्यासाठीं कदाचित् त्याला महिना महिना तळमळावें लागेल—स्वतःवर रात्रंदिवस चडफडावें लागेल; पुनः पुन्हां धडपडावें लागेल ही तळमळ, चडफड आणि धडपड आपल्यांत अजून दुर्मिळ आहे हें माझें खरें दुःख आहे.

बाजारी वाङ्मय आणि यांत्रिक वाङ्मय हे अभिजात साहित्याचे सध्यांचे दोन मोठे शत्रू आहेत. नियतकालिक हा चालू युगांतला चार पैसे मिळविण्याचा धंदा झाल्यामुळें त्याचे चालक मोठीं ध्येयें आणि उच्च वाङ्मय यांच्यापाठीमागें लागण्याच्या फंदांत सहसा पडत नाहींत त्यांना ठरलेल्या वेळीं थोडक्या पैशांत बाजारांत खपणाऱ्या मालाचा पुरवठा कर-णारे लेखक अधिक प्रिय असतात. अशा लेखकांत आरंभीं प्रतिभेचा स्फुलिंग नसतो असें नाहीं. पण तो नित्य निर्वाण होणाऱ्या राखेच्या ढिगाऱ्याखालीं काळांतरानें विझून जातो. बहुसंख्य सामान्य वाचकांची सामान्य रीतीनें करमणूक करणें हें धंदेवाईक नियतकालिकांचें सामान्य ध्येय असल्यामुळें वाङ्मयांतला असामान्यतेला उत्तेजन देण्याइतकी त्यांची रसिकता डोळस राहूं शकत नाहीं त्यामुळें चांगले चांगले लेखक पुढें पुढें चाकोरीतून जाऊं लागतात. ते सवईचे गुलाम होतात आविष्कारापेक्षां अनुकार सुलभ असल्यामुळें प्रसिद्ध परदेशी ग्रंथकारांचे आदर्श ते हळूहळू हरघडी डोळयापुढं ठेवतात. सहाजिकच नकली वाङ्मयाची पैदासविपुल होऊं लागते या सर्वांचें पर्यवसान निर्मितेच्या ( creation ) मूलतत्वाकडे दुर्लभ

होऊन रचनेला (Construction) प्राधान्य देण्यांत होतें. ग्रामोफोन, रेडियो व चित्रपट यांच्यासाठीं निर्माण होणारें बरेचसें यांत्रिक वाङ्मय आपणाला निर्जीव वाटतें याचें कारण हेच आहे.

साहित्याचें खरें सौंदर्य प्रतिभावंताच्या जीवनविषयक उत्कट अनुभूतींत, सूक्ष्म अवलोकनांत, दीर्घ चिंतनांत आणि या तिन्हींच्या मिलाफानें रंगत रंगत केलेल्या स्वच्छंद अविष्कारांत असतें. वेलीवर फुललेल्या फुलांप्रमाणें अशा रीतीनें निर्माण झालेल्या साहित्यांत जो अपूर्व सुगंध दरवळत असतो तो कात्रीनें कापलेल्या आणि अत्तराच्या ओझरत्या स्पर्शानें सुगंधित केलेल्या कागदी फुलांत कुठून असणार ?

सजीव आणि सुंदर साहित्य निर्माण करायला लेखकाचें संस्कारी व्यक्तित्व प्रभावी आणि विकासशील असायला हवें. ' प्रौढत्वीं निज शैशवास जपणें बाणा कवीचा असे ' हे केशवसुतांचे उद्गार तपस्वी कलावंतच सार्थ करूं शकतो. इतरांची वाढत्या वयाबरोबर नवीं नवीं सुंदर स्वप्नें पहायची शक्ति मावळूं लागते. तारुण्यांतल्या कल्पनारम्यतेचा जागीं वास्तवाशीं विन्मुख नसलेली काव्यात्मता निर्माण झाली तरच प्रौढपणीं कलावंताची प्रगति होत राहते. पण ही काव्यात्म वृत्तित रूजणें आणि फुलणें ही कांहीं सोपी गोष्ट नाहीं. कलावंत अनिर्बंध असला पाहिजे असें म्हणत म्हणत विविध भोगाच्या आवर्तांत भ्रमण करीत राहणाराच्या वाऱ्याला ती जशी उभी राहत नाहीं तशी कर्तव्यनिष्ठेनें कौटुंबिक वृत्ति अंगीं बाणवून आयुष्याच्या संकुचित चाकोरींतून जाणारांच्या हातालाही ती लागत नाहीं. जगाच्या भाऊगर्दींत मिसळूनही स्वत्व न विसरणारा, जीवनाच्या पेल्यांतलें विष हें अमृताइतकेंच स्वागतार्ह आहे या अनुभवसिद्ध तत्वावरची श्रद्धा कधींही न ढळूं देणारा, वाङ्मय म्हणजे एका विकासशील व्यक्तीच्या आत्म्याचें मानवतेच्या विशाल आत्म्याशीं चिरंतन जीवनमूल्याविषयीं होणारें संभाषण आहे या भावनेनें आत्मविष्कार करायला प्रवृत्त होणाऱ्या श्रेष्ठ लेखकाचें आणखी असें पुष्कळ वर्णन करतां येईल. पण समोर बालदी ठेवून आणि हातांत ' पोहावें कसें ? ' हें पुस्तक घेऊन ज्याप्रमाणें

कुणी पट्टीचा पोहणारा होत नाहीं, त्याप्रमाणें असलीं वर्णनें वाचून कांहीं कुणी पहिल्या प्रतीचा प्रामाणिक आणि प्रतिभाशाली लेखक बनत नाहीं,

बुद्धि आणि भावना यांची थोडीफार देणगी निसर्गानें दिली असली तरी पहिलवान ज्याप्रमाणें दररोज मेहनत करून शरीरसंपदा कमावतो त्याप्रमाणें आपल्याला अनेक कलागुण विकसित करायचे आहेत या भावनेनें आमच्यापैकीं कितीसे साहित्यिक लेखन करतात ? मोगरीच्या वेलीला गुलाबाचीं फुलें येत नाहींत हें लक्षांत आणून आपल्या प्रतिभेच्या प्रकृतिधर्मांकडे आणि त्याच्या नैसर्गिक विकासाकडे कितीसे कलावंत लक्ष देतात ? कांहीं कांहीं वाङ्मयगुण कष्टसाध्य असले तरी प्रतिभावंताच्या दृष्टिकोनांतून झालेलें अपूर्व जीवनदर्शन हा जो साहित्यकलेचा आत्मा त्याचा साक्षात्कार केवळ परिश्रमानें कधींच होत नाहीं. त्याकरितां लेखकाचें आंतरिक जीवनच सामान्य माणसापेक्षां निराळ्या पातळीवर असायला हवें—तें अधिक पवित्र प्रामाणिक,आणि प्रगतिशील होण्याच्या मार्गावर असायला हवें !

साहित्यिकानें जगावर आईप्रमाणें प्रेम केलें पाहिजे. पण त्याचवेळीं त्या जगाचा कठोर टीकाकार होण्याइतकी अलिप्तताही त्याच्या अंगीं यायला हवी. एखाद्या सुंदर कल्पनेची कली फुलविण्याकरतां प्रहरभर तिची मनधरणी करण्यांत तो जसा चतुर असला पाहिजे, त्याप्रमाणें रस्त्यावरल्या एखाद्या निरपराधी अर्भकाला भोंसकून पुढें जाणाऱ्या गुंडाच्या मनाचें धागेदोरे नाजूक हातानें उलगडण्याचें सामर्थ्यही त्याच्या अंगीं असायला हवें !

अशा प्रयत्नांत प्रतिभेच्या दुर्बळतेमुळें प्रसंगीं अपेश आलें तरी तें खऱ्या कलावंताला भूषणावहच वाटेल शारीरीक सुखापेक्षां आत्म्याचें दुःख जसें जीवनाच्या विकासाला उपकारक होतें. त्याप्रमाणें असलें अपेशसुद्धां साहित्याचा दर्जा उंच करूं शकते, इतकेंच नव्हे तर तें अंतीं समाजावर सुसंस्कार करायसाही समर्थ ठरतें. साहित्यसेवेचा हा मार्ग अत्यंत कठिण आहे हें कोण नाकबूल करील ? पण भवभूति आणि शेक्सपीअर, व्हिक्टर ह्युगो आणि टॉलस्टॉय, तुकाराम आणि आगरकर, हरिभाऊ आपटे आणि गडकरी याच मार्गानें गेले आहेत. हें ठाऊक असूनही आजचे अनेक प्रमुख

मराठी साहित्यिक त्याच्याविषयीं उदासीन आहेत! माझ्या असंतोषाचें कारण हें आहे.

कदाचित् हा असंतोष आत्मपरीक्षणांतून उद्भवला असेल! नाहीं कुणी म्हणावें!

शाहुपुरी,
कोल्हापूर
१२-२-४७

वि. स. खांडेकर

मित्रहो,

महाराष्ट्र–साहित्य–संमेलनाच्या या पंचविसाव्या अधिवेशनाचें अध्यक्ष-स्थान मला देऊन, आपण माझ्याविषयीं जें प्रेम व्यक्त केलें आहे, त्याबद्दल मी आपला अत्यंत ऋणी आहें. जगांत एकच ऋण असें असतें कीं, जों जों तें वाढत जातें, तों तों त्याचा भार वाहणाऱ्या मनुष्याला अधिकच आनंद होत जातो. हें ऋण म्हणजे प्रेम होय. आपल्या या वाढत्या ऋणाला पात्र ठरण्याचा मी मनःपूर्वक प्रयत्न करीन एवढें आश्वासन मी आपणाला देतों.

आज आपल्यापुढें संमेलनाचा अध्यक्ष म्हणून उभा राहतांना माझ्या डोळ्यांपुढें एकवीस वर्षांपूर्वीचें एक चित्र उभें राहत आहे. तें चित्र पाहून मला वाटतें, दैवालासुद्धां कादंबरीकाराप्रमाणें योगायोगाची फार आवड असते. नाहींतर, ज्या एका साध्या वैयक्तिक प्रसंगाची आठवण मी आपल्याला सांगणार आहें, तो बारा एप्रिल दिवशींच कां घडला असता ?

१२ एप्रिल १९२० या दिवशीं नुक्तीच विशी उलटलेला एक उंच हडकुळा मुलगा याच वेळीं सावंतवाडीहून शिरोड्याला जाणाऱ्या रस्त्यानें चालला होता. त्याच्या डोळ्यांवर जाड कांचांचा चष्मा होता आणि हातां-तल्या पिशवींत ‘केशवसुतांची कविता’ होती. चालतांना भोंवतालच्या

काजूंच्या झाडांवर पिकलेले तांबडे पिवळे सुंदर बोंडू त्याला दिसत होते, मधून मधून रानफुलांचा सुगंध त्याला उल्हसित करीत होता, दूर दिसणारे उंच उंच माड त्याचें लक्ष वेधून घेत होते ! पण त्याचे पाय जसे धुळीनें भरून गेले होते, त्याप्रमाणें त्याचें मनहि विचारांनीं गोंधळून गेलें होतें. कुठल्याही रम्य दृश्यांत तें फार वेळ रंगून जाईना. तें एकसारखें म्हणत होतें—आपण एका लहानश्या खेड्यांतल्या शाळेंत मास्तर व्हायला जात आहों. आयुष्यांतले राजरस्ते सोडून न मळलेल्या पाऊलवाटेनें जाण्याची आपली ही लहर वेडेपणाची तर ठरणार नाहीं ना ? चिमुकल्या जलाशयांत मोठ्या माशाचा कोंडमारा व्हावा, तशी या खेड्यांत आपल्या कर्तृत्वाची कुचंबणा तर नाहीं ना होणार ? ही न मळलेली पाउलवाट सुंदर वनश्रीनें नटलेल्या गिरिशिखराकडे जात असेल कीं, एखाद्या खोल खोल दरीच्या तोंडाशीं जाऊन पोंचत असेल ?

जगांतले सर्व कूटप्रश्न सोडविण्याला कालच समर्थ असतो त्यानें त्या-वेळच्या माझ्या या सर्व प्रश्नांचीं उत्तरें आज स्पष्टपणें दिलीं आहेत. शिरोड्यासारख्या खेड्यांत जाऊन माझ्यासारख्या सामान्य मनुष्याच्या जीवनाचा अथवा कर्तृत्वाचा संकोच झाला नाहीं; उलट विकासच झाला. मी त्या खेड्यांत शिक्षक म्हणून गेलों खरा ! पण लवकरच मला एक गोष्ट कळून चुकली—शाळेच्या चार भिंतींच्या आंत मी शिक्षक असलों, तरी त्या भिंतीबाहेरच्या विशाल आणि विलक्षण जगाच्या पायाशीं बसून मला अनेक गोष्टी अजून शिकावयाच्या आहेत. बाळपणीं शहरांत वावरलेल्या माझ्यासारख्या मध्यम वर्गांतल्या पांढरपेशाचें जीवन पडद्यांतल्या स्त्रीप्रमाणें संकुचित झालेलें असतें. माझ्या डोळ्यांवरला हा कृत्रिम जाड पडदा झिरझिरीत करायला आणि ललितवाङ्मयाचा उगम बुद्धीच्या बहुविध चमत्कारांपेक्षां भावनांच्या सखोल अनुभूतींत आहे, वाङ्मयाची मोहिनी जीवनाच्या एखाद्याच पैलूच्या सौंदर्यापेक्षां त्याच्या विविध पैलूंच्या वैचित्र्यांत आहे, या कल्पना मला पटवून द्यायला शिरोड्यानें फार मदत केली आहे. एकवीस वर्षांपूर्वीं मी शिरोड्याला गेलों नसतों तर तात्यासाहेब कोल्हटकरांसारख्या अलौकिक वाङ्मयगुरूचा लाभ होऊनहि माझें लिखाण सध्यापेक्षां अधिक कृत्रिम आणि अधिक निर्जीव राहिलें असतें आणि आज आपल्या पुढें उभें राहून बोलण्याची ही आनंददायक संधिहि मला मिळाली नसती.

या एकवीस वर्षांत मराठी वाङ्मयाच्या कांहीं कांहीं भागांनीं आश्चर्य वाटावें इतकी प्रगति केली आहे. गेल्या दीड दोन तपांतच लघुकथा, लघुनिबंध व बोलपट हे तीन मोहक वाङ्मयप्रकार मराठींत दृढमूल झाले. आज फळें, फुलें व छाया देणारे हे तीन वृक्ष उद्यांच्या मराठी साहित्य–क्षेत्रातले कल्पवृक्ष होतील. कादंबरीच्या क्षेत्रांत हरिभाऊ आपट्यांच्या प्रतिभेचें चांदणें अद्यापि रेंगाळत असलें तरी फडके, वरेरकर, देशपांडे, माडखोलकर प्रभृति अनेक तेजस्वी तारे या काळांतच आपल्या स्वयंभू तेजानें चमकूं लागले. या कालखंडाच्या उत्तरार्धांत नाट्यकलेची प्रकृति क्षय झाल्याप्रमाणें ढांसळूं लागली हें खरें ! पण वरेरकरांसारख्या वैद्यराजांनीं आपल्या आसवांनीं व अरिष्टांनीं आणि अत्र्यांसारख्या डॉक्टरांनीं आपल्या हास्यरसाच्या प्राणवायूनें तिला जगविण्याचा जो प्रयत्न केला, त्याचें मराठी रसिकांना कधींही विस्मरण होणार नाहीं. या वैद्यडॉक्टरांच्या खटपटीनेंसुद्धां तिला गुण आला नाहीं हें खरें ! पण जिथें रोग्याचीं अपथ्येंच विलक्षण, तिथें धन्वंतरी खालीं उतरला तरी त्यालासुद्धां हात हालवीतच स्वर्गाचा रस्ता सुधारावा लागतो.

एखाद्या नगराचें विमानांतून निरीक्षण केलें म्हणजे त्याच्यांतल्या मोठ्या मोठ्या प्रेक्षणीय गोष्टी चटकन् नजरेंत भरतात. त्या दृष्टीनें गेल्या वीस वर्षांतल्या मराठी वाङ्मयाकडे पाहिल्यास रविकिरणमंडळाचें काव्य, ज्ञानकोश आणि त्याच्या पावलावर पाऊल ठेवून प्रगतीचा मार्ग आक्रमणारे अनेक कोश, 'टिळक–चरित्र,' 'प्रतिभा–साधन,' 'आधुनिक भारत,' 'स्मृतिचित्रें,' 'छंदोरचना' यांच्यासारखे किती तरी वैशिष्ट्यपूर्ण ग्रंथ, दरमहा वीस पंचवीस हजार घरांत आणि तीन साडेतीन लाख मनांत प्रवेश करणारें किर्लोस्कर मासिक, दैनिक व साप्ताहिक वृत्तपत्रांची सर्व दृष्टींनीं झालेली आश्चर्यकारक वाढ, इत्यादि गोष्टी आपलें लक्ष वेधून घेतात. ललित वाङ्मयांतल्या कर्तृत्वामुळें ज्यांना आज घरोघर लोकप्रियता मिळाली आहे अशीं वीस पंचवीस ठळक नांवें सोडून दिलीं तरी प्रो. कृ. पां. कुलकर्णी, प्रो. शेजवलकर, प्रो. न. र. फाटक, जावडेकर, प्रो. माटे, प्रो. द. के. केळकर, प्रो. बनहट्टी, वा. ना. देशपांडे, पां. वा. गाडगीळ, बावडेकर, क्षीरसागर वगैरे अनेक नामांकित लेखकांनीं या काळांतलें साहित्य समृद्ध केलें आहे. इतकेंच नव्हे तर विविध क्षेत्रांत नवीं नवीं नांवेंही आपणाला

अत्यंत आकर्षक वाटूं लागलीं आहेत. बेडेकर, कवठेकर, 'पाणकळा' कार दिघे, चोरघडे, कुसुमाग्रज, प्रो. आंबेकर, शेष, बोरकर, इत्यादिकांच्या गेल्या चार पांच वर्षांत प्रकाशित झालेल्या कृतींत जी चमक दिसून येते, तीं मराठीची उज्ज्वल परंपरा अखंड चालणार आहे अशी जणुं कांहीं महाराष्ट्राला साक्षच देत आहे.

या वर्णनावरून आजचें मराठी वाङ्मय घोडदौडीनें प्रगति करीत आहे असाच कुणीहि निष्कर्ष काढील. आजच्या आमच्या वाङ्मयांत घोडदौड आहे यांत शंकाच नाहीं ! या घोडदौडींतले घोडे जसे उमदे आहेत तसे त्यांच्यावर बसलेल्या सैनिकांचे पोषाखही फार सुंदर आहेत, नि ते गात असलेलीं गाणीं तर फार फार गोड आहेत. या साऱ्या सरंजामांत एकच उणीव आहे—या सैनिकांपैकीं बहुतेकांच्या हातांत तरवारी नाहींत, अलगुजें आहेत.

गेल्या वीस वर्षांतल्या मराठी वाङ्मयाला भाषासौंदर्य, कलाविलास, तंत्र-शुद्धता इत्यादि वाङ्मयीन मूल्यांची कसोटी लावली तर कट्टर टीकाकारालाहि मुक्तकंठानें त्याची स्तुतीच करावी लागेल. पण यापेक्षां अधिक खोल जाऊन आपण पाहूं लागलों तर आजच्या ललितवाङ्मयाचें सौंदर्य, अद्यावत् वेषभूषा व केशभूषा केलेल्या एखाद्या फिक्कट तरुणीच्या सौंदर्यासारखें आहे असें आढळून येईल. या पिढीनें फडके व माडखोलकर हे दोन असामान्य भाषाप्रभु निर्माण केले हें कोण अमान्य करील ? एवढेंच नव्हे, तर आजकाल कॉलेजांत असलेले होतकरू लेखकही किंचित् अशुद्ध पण नादमधुर व सफाईदार भाषा लिहितात याचें कोणाला कौतुक वाटणार नाहीं ? पण आकर्षक भाषेचें हें आवरण दूर करून आपण या उद्यांच्या लेखकांच्या वाङ्मयनिर्मितीकडे वळलों तर तिथें काय दिसून येतें ? निर्जीव नकला, आंधळें अनुकरण, लेखन हा एक सुंदर शाब्दिक खेळ आहे या कल्पनेवर उभारलेले हवेंतले मनोरे ! गेल्या वीस वर्षांत आपलें राजकारण असहकारितेपासून समाजवादापर्यंत—निदान गांधीवादावर समाजवादाचें कलम करतां येईल कीं नाहीं या कल्पने-पर्यंत—आलें आहे. पण आमच्या आजच्या साप्ताहिकांना वैयक्तिक उखाळ्या पाखाळ्या आणि ताळतंत्र सोडलेलीं विडंबनें यांची जशी चटक आहे, तशी विविध राजकीय कल्पना प्रामाणिकपणें बहुजनसमाजापर्यंत नेऊन पोंचविण्याची तळमळ

कुठें आहे ? ज्योतिष आणि चित्रपट हींच जिथें अनेक नियतकालिकांचीं आराध्यदैवतें झालीं आहेत, तिथें प्रक्षोभक विचारसरणी आणि उद्‌बोधक मार्गदर्शन यांची अपेक्षा करायची तरी कुणापासून ? सुवासिक फुलांच्या अपेक्षेनें कागदी फुलें हुंगावींत आणि निराश होऊन तीं दूर फेकावींत तशी आजकालच्या अनेक नियतकालिकांच्या वाचकांची स्थिति होत असते. या फुलांना चुकून कोणी तरी अत्तर लावलें असेल या आशेनें तीं हुंगून पाहणारांची तर अनेकदा फटफजितीच होते. कारण, रॉकेल हें अत्तराहूनही अधिक सुगंधी असतें असा या बाबतींत चालू काळांतला शिष्टसंमत संकेत होऊं पहात आहे !

नियत–कालिकांहूनही लोकांना अधिक आकर्षक वाटणारा बोलपट हा वाङ्‌मय–प्रकार पाहिला तरी हाच अनुभव येईल. या क्षेत्रांत 'तुकाराम' देणारे फत्तेलाल–दामले, 'धर्मात्मा', 'कुंकू' व 'माणूस' निर्माण करणारे शांताराम आणि 'छाया' व 'ब्रह्मचारी' काढणारे विनायक यांच्यासारखे कुशल दिग्दर्शक आहेत. पण असें असूनही गेल्या पांच वर्षांत सर्वसाधारण बोल-पट म्हणजे एक उत्तान किंवा उथळ प्रेमकथा, बोलपट म्हणजे सुंदर नटीनें गायिलेलीं त्याच त्याच शब्दांची गोड गाणीं, बोलपट म्हणजे भडक प्रसंग आणि पांचट विनोद यांनीं भरलेली एक अस्वाभाविक गोष्ट, या किंवा अशाच प्रकारच्या समजुती वरच्या दर्जाच्या प्रेक्षकांत कां रूढ व्हाव्यात ? चिपळूणकर-आगरकरांच्यापासून केळकर-जोश्यांपर्यंत निःस्पृह टीकाकारांची परंपरा ज्या महाराष्ट्रांत अखंड चालत आली, त्या महाराष्ट्रांत आजच उत्कृष्ट टीकाकारांचा दुष्काळ पडावा हें कशाचें लक्षण आहे ? एका मोठ्या लेख-कानें उठून दुसऱ्या मोठ्या लेखकाला अभिनव साहित्यसम्राट् बनवावें आणि त्या दुसऱ्या लेखकानें पहिल्याचें ऋण तावडतोब फेडण्याकरितां थोडेंफार शिकलेल्या लोकांनासुद्धां समजायला कठिण अशा त्याच्या लेख-नाचा बहुजनसमाजाचें वाङ्‌मय म्हणून गौरव करावा हें कशाचें द्योतक आहे ? सरस्वतीच्या दरबारांत भाट आणि मारेकरी या दोघांनाही जागा नाहीं हें न कळण्याइतकी आमच्या बुद्धीला बधिरता कां यावी ? श्यामा, घोरपडे आणि मांजरेकर यांच्यासारख्या कुशल कथालेखकांचें जिथें अना-हूत कौतुक केलें जात नाहीं, कुसुमाग्रज आणि बोरकर यांच्यासारख्या प्रतिभा-

वान् कवींना जिथें कोपऱ्यांत उपेक्षित स्थितींत पडून राहावें लागतें, तिथें विविध अभिजात वाङ्मयाचा निर्दोष व मोहक विलास विपुलतेनें आढळूं नये यांत अस्वाभाविक असें कांहींच नाहीं. ज्या तळ्यांत पाणी आटत जाऊन जवळ जवळ चिखलच राहिलेला असतो, तिथें कमळेंही कमी फुलतात हा सृष्टीचा नियम वाङ्मयालाही लागू आहे.

माझ्या या विधानांत कित्येकांना सात्विक संताप दिसेल, तें ऐकून कित्येकांचा आंतला आवाज 'म्हातारा' 'म्हातारा' असा कौल देऊं लागेल, कित्येकांना अकारण बाँबगोळे टाकून गडबड उडवून देणारी आत्मपूजक मनोवृत्तिच यांत आढळेल, कित्येकांना मी घाबरटपणानें अतिशयोक्तीची अतिशयोक्ति करीत आहे असा भास होईल. पण माझी खात्री आहे कीं आपण शांतपणानें व सूक्ष्म दृष्टीनें सरस्वती मंदिरांतल्या कांहीं दालनांत हिंडून आलांत, आजकाल त्यांची सजावट कशी केली जात आहे हें पाहिलेंत, म्हणजे माझें मत वकिलाचें नसून न्यायाधीशाचें आहे असें आपणालाही वाटेल.

काव्य हा मराठी शारदेचा सर्वांत जुना व सर्वांत वैभवशाली असा विभाग होय. त्याच्या आधुनिक प्रपंचाकडे पाहिलें तरी टिळक—केशवसुतांपासून गिरीश—यशवंतांपर्यंत भावमधुर आधुनिक कवितेचा प्रवाह विविध मुखांनीं एकसारखा वाहत आला आहे असें दिसून येईल. पण रविकिरण—मंडळानें कवितेला लोकप्रियतेच्या शिखरावर नेऊन बसविल्यानंतर तिला जी उतरती कळा लागली ती थांबल्याचें लक्षण मात्र अजूनही दिसत नाहीं. रविकिरण—मंडळाच्या काव्यगायनांत काव्यही होतें आणि गायनही होतें. पण भागीनें व्यवहार करणाऱ्या दोन मित्रांपैकीं एकानें दुसऱ्याला सफाईनें बुडवावें, तशी इतर अनेक कवींच्या काव्यगायनांतल्या गायनानें काव्याची स्थिति करून टाकली. कल्पनेनें खुललेलें किंवा भावनेनें फुललेलें गीत गायिलें असतां अधिक गोड लागतें ही कल्पना मागें पडून गोड गळ्यांतून बाहेर पडलेलें कुठलेंही पद्य हें काव्य असलेंच पाहिजे, या नवीन सिद्धांतानें तिची जागा सध्यां बळकावलेली आहे. रेडिओ, ग्रामोफोन व बोलपट यांच्यामुळें जें काव्य आज घरोघर लोकप्रिय होत आहे, त्याची छाननी केल्यास लवकरच काव्यनिर्मितीचें एखादें स्वस्त यंत्र तयार होईल—निदान झटपट काव्याच्या

छोट्या छोट्या मार्गदर्शिका निघतील—असा कोणी तर्क केला तर तो फारसा चुकीचा ठरणार नाहीं. 'खुलवित', 'डुलवित', 'थयथय', 'गरगर', 'प्रेम', 'प्रीति', 'राधा', 'सजणा', 'सजणे' 'हांसत', 'नाचत' अशासारखे शें-दोनशें शब्द व 'कृष्ण—राधा' किंवा 'तो—ती' हीं दोन जोडपीं घेतलीं कीं एवढ्या भांडवलावर काव्याचा धंदा यशस्वी होतो, असा आजकालच्या महाराष्ट्राचा अनुभव आहे. ग्रामोफोन व बोलपट यांच्या गाण्यांना काळाच्या व कथेच्या मर्यादा असल्यामुळें त्यांच्या पद्यरचनेंतील निर्जीव कृत्रिमता एकवेळ क्षम्य ठरेल! पण या पद्यरचनेपलीकडेच्या उच्च काव्याची जाणीवच सामान्य वाचकाला असूं नये, बैठकींतल्या संभाषणांत माणसें ज्या कोट्या करितात किंवा ज्या हंसविणाऱ्या गोष्टी बोलतात त्याच गणमात्रांचा आधार घेऊन मांडल्या कीं असल्या क्षणजीवी चुटक्यांची कवितेंत गणना व्हावी आणि कुसुमाग्रजांची 'स्वप्नाची समाप्ति' किंवा बोरकरांची 'तेथें कर माझे जुळती' या घरोघर ऐकूं याव्यात इतक्या योग्यतेच्या कवितांचे चरण गुणगुणतांनासुद्धां कुणी आढळूं नये या गोष्टी काय दर्शवितात?

फुलें आणि मुलें, संध्यातारका आणि चांदरात हे काव्याचे विषय जुने झाले म्हणून मराठी काव्याला ओहोटी लागली असें अनेकांना वाटतें. व्यक्तिशः माझें मत तसें नाहीं. काळाबरोबर सामाजिक मूल्यें बदलत आहेत. पण मनुष्याच्या सर्व नैसर्गिक भावना पूर्ववत् कायम आहेत. त्याची सौंदर्य-दृष्टि पूर्वीइतकीच तरल आहे. किंबहुना ती पूर्वीहून अधिक सूक्ष्म व अधिक संवेदनाशील होत आहे. पण सतारीचे कोमल स्वर नगाऱ्यांच्या धांगडधिंग्यांत बुडून जातात हा कटु अनुभव सध्यांच्या मराठी कवितेलाही येत आहे.

आजचा कवि टिळकांच्या पद्धतीनें 'वनवासी फूल' लिहूं शकणार नाहीं. परंतु आपल्यावर आभाळांतून बॉम्बवृष्टि केव्हां होईल याचा नेम नाहीं म्हणून व्याकुळ झालेल्या फुलाशीं त्याला आपलेपणानें बोलायला काय हरकत आहे? 'एक अमेरिकन मुलगी' पाहून वात्सल्यानें तिच्या सौंदर्याचें वर्णन करण्याची टिळकांना जी स्फूर्ति झाली, ती आजच्या कवींना कदाचित् होणार नाहीं. पण आपल्या मायदेशांतून हद्दपार झालेली आणि आपल्या प्रियकराचा शोध करीत हिंदुस्थानांत आलेली ज्यू तरुणी त्यांच्या

काव्याचा विषय कां होऊं नये ? केशवसुतांना 'तुतारी' किंवा तांब्यांना 'रुद्रास आवाहन' ही कविता ज्या काळांत स्फुरली त्याच्यापेक्षां आजचा काळ कमी भावनामय आहे, कमी स्फूर्तिप्रद आहे असें कोण म्हणेल ? पण या नव्या काळाशीं समरस होऊन गाण्याची तयारीच आमच्या बहुतेक कवींनीं केली नाहीं. त्यांतून एखादा जातिवंत कवि स्वच्छंदानें गाऊं लागला तर त्याचें कौतुक करण्याइतकी सूक्ष्म रसिकताही आजच्या सर्वसामान्य वाचकवर्गांत नाहीं. तिसऱ्या दर्जाच्या चुरचुरीत वाटणाऱ्या लिखाणाच्या अतिपरिचयानें आजच्या महाराष्ट्रीय रसिकतेला एक प्रकारची बधिरता आली आहे. काव्याच्या या उपेक्षेचा परिणाम दुसरा काय होणार ? मधुर ग्रामगीतें गाणारे ठोकळ विनोदी गोष्टी लिहूं लागले आणि रानावनांत शीळ घालणारी ना. घ. देशपांड्यांची रसवंती मुकी झाली. अजूनही एकदोन गरुड आभाळांत आपलें अस्तित्व दर्शवीत आहेत. तीन चार गरुडांचीं पिलें सूर्याकडे टक लावून दूर पर्वतशिखरावर बसलीं आहेत. पण त्यांच्याकडे लक्ष कोण देतो ? पोपट पिंजऱ्यांतले डाळिंबाचे दाणे खाऊन पोपटपंची करीत आहेत, मधून मधून मैनांना साद घालीत आहेत आणि त्यांच्या या मोडक्या तोडक्या उद्‌गारांना काव्य समजून बहुजनसमाज तें ऐकण्यांत दंग होऊन जात आहे.

काव्याला लागलेल्या या ओहटीची भरपाई विनोदानें केली असती तर संक्रमणकाळाचें एक लक्षण म्हणून या स्थित्यंराचें समर्थन करतां आलें असतें. पण उच्च दर्जाचें विनोदी वाङ्मय तरी आपल्याकडे झपाट्यानें कुठें वाढत आहे ? प्रो० चिंतामणराव जोश्यांचा वैचित्र्यपूर्ण व प्रसंगनिष्ठ विनोद, चंद्रज्योतीप्रमाणें चमकत उडणारे अत्र्यांचे विनोदी संवाद आणि ना. धों. ताम्हनकर, शामराव ओक व वि. मा. दी. पटवर्धन यांचा अधून मधून होणारा स्वैरसंचार हेच काय ते आमच्या आजच्या विनोदाचे झरे. या सर्वच झऱ्यांत विपुल पाणी आहे किंवा आहे तें पाणी स्फटिकासारखें निर्मळ आहे असें नाहीं. पण हे झरे वाहते तरी आहेत. अधून मधून दर्शन देणारे हे पांच विनोदी लेखक सोडून दिले तर आजच्या वाचकाला आपली नित्याची विनोदाची भूक भागविण्याकरितां नियतकालिकाकडेच वळावें लागतें. एका दृष्टीनें हें स्वाभाविकच आहे. जीवनकलह सारखा वाढत

आहे, मुंबईसारख्या शहरात अर्धे यंत्र व अर्धे माणूस होऊन मनुष्याला जगावें लागत आहे. आयुष्याच्या या भयंकर उकडहंडींत विनोदाच्या शीतल वायुलहरी कुठूनही आल्या तरी त्या हव्याच असतात. त्या दृष्टीनें अच्युतराव कोल्हटकरांपासून प्र. श्री. कोल्हटकरांपर्यंत अनेक साहित्यिकांनीं वृत्तपत्रांतून आपल्या विनोदाचा इष्ट असा आविष्कार केला असून तो कभी अधिक प्रमाणांत यशस्वीही झाला आहे. इंग्लिशमध्यें 'पंच' सारख्या वृत्तपत्रांनीं हेंच कार्य इतक्या सुरस रीतीनें केलें आहे कीं, त्यांच्यांतल्या चुटक्यांचे नि छोट्या लेखांचे संग्रह वाङ्मयदृष्ट्याही वाचनीय वाटतात. त्यांतला साराच विनोद कालानें कोमेजून जाईल असा नसतो. पण आपल्या वृत्तपत्रांतल्या स्फुट विनोदी लेखनाला अभिजात वाङ्मयाची ही चाळण लावली तर त्यांतला कितीसा भाग खालीं पडूं शकेल हें काय सांगायला हवें? वृत्तपत्रीय विनोदांत लहान मुलांचा अवखळपणा किंवा उच्छृंखलपणा असणें स्वाभाविक आहे हें मान्य करूनही आजकालच्या असल्या वाङ्मयाचें परीक्षण केलें तर त्यांतून काय निष्पन्न होतें? वर्तमानपत्री विनोदाला सर्व विषय मोकळे असल्यामुळें त्यानें विमानाप्रमाणें स्वैरसंचार करायला हवा! पण भोंवतालीं अनेक चिरंतन महत्त्वाच्या राजकीय व सामाजिक वडामोडी होत असतांना आमच्या वृत्तपत्रीय लोकप्रिय लेखकांची विनोदबुद्धि फक्त दोनच गोष्टींभोंवतीं पिंगा घालते—बेछूट वैयक्तिक टीका नि कामाविकाराचें अवास्तव प्रदर्शन. या विषयांपलीकडे कधींकाळीं या विकृत विदूषकांची नजर गेलीच तर ती गांधीजींच्या शेळीवर किंवा एखाद्या सिनेमा नटीवरच पडायची! कल्पकतेनें नटलेला उपहास, राजकीय किंवा सामाजिक ढोंगांच्या मर्मस्थळीं जाऊन बसणारा आणि त्यांना रडकुंडीला आणणारा उपरोध, गंभीर विषय सर्वसामान्य वाचकाच्या गळीं उतरावा म्हणून त्याला दिलेली सौम्य पण रम्य विनोदाची जोड, या गोष्टींचा आमच्या नियतकालिकांत दुष्काळ नसला तरी, आजकाल त्या बऱ्याच दुर्मिळ आहेत यांत शंका नाहीं. काव्याप्रमाणें विनोदांतही सूक्ष्म, भव्य, उदात्त किंवा अभिजात अशी निर्मिति करण्याकडे अनेक कलावंतांचें लक्षच नाहीं! क्वचित् अशी कृति निर्माण झाली तर तिचें गुणग्रहण करण्याइतकी सामान्य वाचकांची अभिरुचीही निर्मळ राहिलेली नाहीं. मराठी लघुकथेंत व लघुनिबंधांत सहजसुन्दर विनोदाचा हळुहळु विकास होत आहे.

पण त्याचें महत्त्व मूठभर वाचकाखेरीज इतरांना वाटत नाहीं आणि पटत नाहीं ! जिथें रानटी करवंदें द्राक्षें म्हणून खपतात, तिथें द्राक्षाची लागवड करण्याचें परिश्रम कोण घेणार ?

काव्य व विनोद या दोन क्षेत्रांतली आजची मराठी प्रतिभा शेवाळ्यानें झांकलेल्या पाण्याप्रमाणें झाली आहे. उच्च कलेपेक्षां तात्पुरत्या लोकप्रियतेकडे लक्ष देऊनच या क्षेत्रांतलें बहुतेक वाङ्मय निर्माण होत आहे. सामान्य विषय, सामान्य कल्पकता आणि सामान्य मांडणी यांचा त्रिवेणीसंगम असामान्य भासविण्याकरितां असल्या लेखकांना उत्तानपणाची किंवा बेछूट-पणाची मदत घ्यावी लागली नसती तरच नवल झालें असतें !

काव्य आणि विनोद या दोन क्षेत्रांतल्या अनुभवांवरूनच आजच्या ललित वाङ्मयाचें वर्णन करावयाचें झालें तर त्याची प्रगति खुंटली आहे असेंच म्हणावें लागेल. या दोन क्षेत्रांत त्याच्या विकासाला पुरेसा जीवनरस मिळत नाहीं हें उघड आहे. या रसदारिद्र्याच्या मुळाशीं सामाजिक परिस्थिति आहे कीं कला-कारांची विकासशून्यता अथवा आत्मनिष्ठ मनोवृत्ति आहे हा प्रश्न निराळा ! पण आपल्या आजकालच्या काव्यविनोदांत थोडीफार रम्यता असली तरी भव्यता मुळींच नाहीं, कल्पनेचें चातुर्य मधूनमधून चमकलें तरी तिच्या गरुडभराऱ्या कधींहि दिसत नाहींत, जीवनाचें प्रतिबिंब क्वचित् आढळलें तरी तें सहसा अविकृत असें असत नाहीं.

पण काव्य आणि विनोद हीं ललित वाङ्मयाचीं महत्त्वाचीं अंगें असलीं तरी त्यांच्यावरून निघणारे निष्कर्ष कादंबरीसारख्या विशाल व अनंत हस्तांनीं जीवनरस लुटणाऱ्या वाङ्मयाला तरी लागू पडणार नाहींत असें अनेकांना वाटेल. एका दृष्टीनें हें खरेंही आहे. गेल्या तीस वर्षांत मराठी कादंबरीचें वैभव एखाद्या महानदीप्रमाणें वाढत आलें आहे. महानदीला थोड्या थोड्या अंतरावर नवीन नदी येऊन मिळावी त्याप्रमाणें दर दोन तीन वर्षांनीं एखादा नवा कादंबरीकार उदयाला येऊन कादंबरी–वाङ्मय अधिक संपन्न करीत आहे. त्यामुळें आजची कादंबरी जर मराठी मनाच्या आशा–आकांक्षा पूर्णपणें व्यक्त करीत असेल, मराठी प्रतिभेचा विविध विलास दर्शवीत असेल, मराठी आत्म्याच्या विकासाची सर्वस्पर्शी साक्ष देत असेल, तर इतर क्षेत्रांतल्या

वैगुण्यांमुळें उत्पन्न होणारें असमाधान अंशतः दूर व्हायला कांहींच हरकत नाहीं.

त्या दृष्टीनें मराठी कादंबरीकारांकडे पाहूं लागलों कीं प्रथम वामनराव जोश्यांची मूर्ति डोळ्यांपुढें उभी राहते. १९२९ मध्यें ‘ सुशीलेचा देव ’ आणि १९३४ मध्यें ‘इंदु काळे आणि सरला भोळे’ या दोन किंचित् सदोष पण अत्यंत सजीव कादंबऱ्या लिहून तात्त्विक कादंबरीकार या नात्यानें पूर्वी मिळविलेला लौकिक त्यांनीं अनेकपटींनीं वृद्धिंगत केला. पण गेल्या सहा सात वर्षांत वामनराव जवळ जवळ वानप्रस्थ झाले आहेत. इंग्लिश वाङ्मयांतला वामनरावांचा समानधर्मा वेल्स पहा. वयाच्या दृष्टीनें स्वारी पाऊणशेंच्या घरांत आली आहे. पण त्याच्या लेखनाचा वेग आणि जोम अणुमात्रही कमी झालेला नाहीं ! आणि आमचे वामनराव ! ते कादंबरीच नव्हे तर इतरसुद्धां कांहीं लिहीत नाहींत. या मौनव्रताचें कारण विचारलें तर ‘ माझ्या पाशीं आतां सांगण्यासारखें कांहीं उरलें नाहीं ’ एवढेंच ते सांगतात. मुलींच्या कॉलेजांतल्या अध्यापनाच्या कार्यामुळें त्यांचें निरीक्षणाचें क्षेत्र संकुचित झालें असेल ! पण टीचभर हस्तिदंतावर ताजमहाल रेखणाऱ्या कलावंताप्रमाणें त्याच लहानशा क्षेत्रांतून त्यांनीं सुशीला, सरला आणि इंदु निर्माण केल्या होत्या ! नाहीं का ? मग त्यांची निर्माण-शक्ति अशी विरक्त कां झाली ? किती तरी सामाजिक समस्या आणि कौटुं-बिक कूटप्रश्न वामनरावांच्या प्रतिभेच्या स्पर्शाची वाट पहात तसेच तिष्ठत राहिले आहेत. आपण इंदु काळेमध्यें कलासक्तीचा प्रश्न ज्या रीतीनें सोडविला ती समाधानकारक नाहीं, उच्च ध्येयांत ज्याप्रमाणें व्यावहारिक दुःख असतें त्याप्रमाणें तात्त्विक आनंदही असतो हें खरें असलें तरी विनायकराव आणि सरला यांचीं ध्येयें आजच्या काळाला अत्यंत अपुरीं पडणारीं आहेत, इत्यादि गोष्टी वामनरावांना काय इतरांनीं सांगायला हव्यात ?

सुशीलेच्या देवाचेंच उदाहरण घेऊं. सुशीलेच्या वसतिगृहाच्या शेजारीं वडारी लोकांचीं पालें असतात. जनावरांपेक्षांही अधिक कष्टानें आयुष्य काढणाऱ्या या दुर्दैवी प्राण्यांच्या वस्तींत पटकीचा उपद्रव सुरू होतो. सुशीला तेथें जाते, त्यांची शक्य ती शुश्रूषाही करते. पण फाटलेलें आभाळ पृथ्वीवरला कुठ-

लाही शिंपी शिवूं शकत नाहीं ! अखेर व्हायचें तेंच होतें ! सत्तरऐंशी वडारी एका आठवड्यांत पटकीला बळी पडतात. यावेळीं सुशीला संतापानें उद्गारते ' हीं गरीब माणसें पटकीला बळी पडलीं का आपल्या समाजव्यवस्थेला बळी पडलीं हा मला प्रश्न पडला आहे !'

सुशीलेच्या या प्रश्नाचें उत्तर द्यायला, तें उत्तर होकारार्थी असल्यास ही अमानुष समाजव्यवस्था कशी बदलायची हें सांगायला, वामनरावांनीं यापूर्वीच पुढें यायला हवें होतें. त्यांच्या प्रतिभेला वार्धक्य आलें आहे असें मला वाटत नाहीं. तिच्यावर एक प्रकारचें उदासीनतेचें पटल पसरलें आहे. भोंवतालची वाङ्मयीन परिस्थिति पाहून ती निष्क्रिय झाली आहे. गुडघा-भर पाण्यांत पोहण्याच्या शर्यतींत भाग घ्यायला ती उत्सुक नाहीं. ज्यांना उथळ शृंगाराचे मळे पिकवितां येतात किंवा अवखळ हास्याचे पूर वाहवतां येतात, त्यांच्याच वाङ्मयाला आज महत्व आहे हें ओळखून तर त्यांनीं आपल्या लेखणीला विश्रांति दिली नसेल ना !

प्रश्नचिन्ह हा वामनरावांचा जिवलग मित्र आहे. त्यामुळें त्यांच्या लेखन-संन्यासाच्या बाबतींत अनेक उत्तरें संभवूं शकतील. पण वरेरकरांच्या कोशांत संशय, शंका, प्रश्नचिन्ह वगैरे शब्दच नाहींत. पूर्णविराम हेंच त्यांच्या निशाणावरलें प्रतीक. 'सांगायसारखं माझ्याजवळ कांहींच नाहीं' हें वाक्य विनयानें असो अथवा आत्मविश्वासाच्या अभावानें असो त्यांच्या तोंडून कधींच बाहेर पडणार नाहीं. उलट ते ठांसून म्हणतील ' मी आतां पर्यंत सांगितलं हें कांहींच नाहीं. नुसते चार चुळके पाणी तुमच्या पदरांत पडलं आहे. पण बाकीचा समुद्र—समुद्र कसला ! महासागरच म्हणाना— अजून माझ्या पोतडींतच आहे.'

या आत्मविश्वासाला शोभेल असें विपुल कादंबरीलेखन त्यांनीं केलें आहे हें कुणीही कबूल करील. गेल्या तेरा चौदा वर्षांत त्यांनीं विसाहून अधिक कादंबऱ्या लिहिल्या आहेत. त्यांच्या कादंबऱ्यांतल्या विषयांचें वैचित्र्य त्यांतल्या माणसांइतकेंच आश्चर्यजनक आहे. त्याचप्रमाणें वाचकाला मलबार-हिलपासून वेड्याच्या इस्पितळापर्यंत आणि आय्. सी. एस्. अधिकाऱ्यापासून कोंकणांतल्या भंडाऱ्यापर्यंत फिरविणारा दुसरा कादंबरकार अजून

मराठी भाषेंत झालेला नाहीं. कोमलतेच्या दृष्टीनें ‘ विधवा-कुमारी ’, चटकदारपणांत ‘ निकारी वात्सल्य ’ आणि प्रचाराचें साधन म्हणून ‘ पेटतें पाणी ’ या त्यांच्या कादंबऱ्या निःसंशय चांगल्या आहेत. असें असूनही कादंबरीकार म्हणून वरेरकर कितीसे लोकप्रिय आहेत ? कल्पकता, कलाविलास व भावनेची आर्तता हे गुण त्यांच्या कादंबऱ्यांत उत्कटत्वानें आढळत नाहींत हें खरें ! पण फडके, खांडेकर आणि माडखोलकर यांच्या कादंबऱ्यांत नसलेले जे गुण त्यांच्या कृतींत आहेत, त्यांचें तरी मोठ्या प्रमाणांत वाचकांनीं कौतुक केलें आहे का ? असें कां व्हावें ?

याचें उत्तर एकच आहे. वाङ्मयाच्या अंतरंगापेक्षां त्याच्या बहिरंगावरच संतुष्ट होण्याची चटक आपल्या वाचकांना लागली आहे—नव्हे, लावण्यांत आली आहे. काव्याच्या अर्थापेक्षां गळ्याचा गोडवा जसा आम्हाला अधिक मोहिनी घालतो, त्याप्रमाणें काय सांगितलें गेलें आहे यापेक्षां तें कसें सांगितलें आहे यालाच आपण अधिक किंमत देऊं लागलों आहों. देवळांतल्या मूर्तीला दुरूनच नमस्कार करून देवालयाच्या भिंतीवर काढलेलीं चित्रें पाहण्यांत दंग होणाऱ्या लहान मुलासारखी आजच्या वाचकवर्गाची स्थिति झाली आहे. तो भाषेच्या विलासावर बेहद्द खूष होतो. शृंगार अथवा हास्य यांच्या फवाऱ्यांनीं त्याचें अंग पुलकित होतें. पण भाषेचा शृंगार हा वाङ्मयाचा आत्मा होऊं शकत नाहीं, कारंजांतल्या तुषारांनीं कालव्याच्या पाण्याची उणीव भरून निघूं शकत नाहीं, शृंगार आणि हास्य यांच्या अंगांत कोमेजलेल्या मनाला घटकाभर फुलविण्याची शक्ति असली तरी मानवी अंतःकरणांतल्या सुप्त भावनांना चिरंतन आवाहन द्यायला, मनुष्याचें उदात्त विचार उचंबळवून टाकायला किंवा सामान्य व्यक्तीच्या डोळ्यांपुढें एक नवी ध्येयसृष्टि नाचत ठेवायला निव्वळ शृंगाराचा किंवा प्रहसनपर हास्याचा उपयोग होऊं शकत नाहीं, हें त्याच्या लक्षांतच येत नाहीं.

पण याबद्दल वाचकवर्गालाच सर्वस्वीं जबाबदार धरणें मात्र योग्य होणार नाहीं. सामान्य मनुष्य जसा संसारांत त्याप्रमाणें सामान्य वाचक वाङ्मयांत प्रवाहपतित बनतो. त्यामुळें आपण जें आवडीनें वाचीत आहों तें सुंदर

आणि सजीव वाङ्मय आहे कीं नाहीं हें पाहण्याची त्याला फारशी शक्तिही नसते आणि सवड तर नसतेच नसते. चहाला थोडेसें अफूचें पाणी दिलें कीं त्याची चटक हां हां म्हणता गिऱ्हाइकाला लावतां येते या अनुभवांत नवीन असें काहींच नाहीं. पण या बाजारी युक्तीचा अवलंब करणारे असंख्य लोक सरस्वतीच्या पवित्र मंदिरांतही असतात याची मात्र बहुतेक वाचकांना दाद नसते. मोहिनीमंत्रानें भारलेल्या मनुष्याचा जसा स्वतःच्या मनावर ताबा असतः नाहीं, तशी सर्वसामान्य वाचकवर्गाची अभिरुचिही स्वतंत्र राहूं शकत नाहीं. ज्या पोकळ सिद्धांताचे नगारे त्याच्या कानांजवळ वारंवार वाजत असतात, तेच सिद्धांत त्याला खरे वाटूं लागतात. ज्या रसांनीं थबथबलेल्या कथा त्याला पुनःपुन्हां वाचायला किंवा पहायाला मिळतात, त्यांच्याविषयीं नकळत त्याच्या मनांत अंध आसक्ति उत्पन्न होते. बहुजनसमाज हा नेहमींच लहान मुला-सारखा असतो. नुसत्या संवयीमुळें त्याला एखाद्या गोष्टीविषयीं प्रीति किंवा उदासीनता वाटूं लागते.

शृंगार आणि हास्य या दोन रसांकडेच सध्यांच्या वाचकांचा जो विलक्षण ओढा दिसत आहे त्याचीं कारणेंही थोडीफार अशींच आहेत. 'कोलंबसानें अमेरिकेचा किंवा आइनस्टाइननें सापेक्षतेच्या सिद्धांताचा शोध लावल्याचें एक वेळ खोटें ठरेल; पण शृंगार आणि हास्य या दोन रसांचा शोध आम्हींच लावला आहे!' अशा अभिमानाचे झटके जिथें नामवंत साहित्यिकांनासुद्धां मधून मधून येतात, तिथें सध्यांच्या कारुण्यपूर्ण पण क्रांतिप्रवण अशा समाजजीवनाचीं विविध, सूक्ष्म व जिवंत चित्रें वाचकांना कुठून पाहायला मिळणार? डोळे हे रडण्याकरितां किंवा रागावण्याकरिता नाहींत, फक्त प्रेमकटाक्ष टाकण्याकरितांच आहेत—ओठांचा संबंध अन्यायाची चीड येऊन बाहेर पडणाऱ्या उद्गारांपेक्षां चुंबनाशींच अधिक आहे—हातांचा उपयोग एखाद्या उदात्त ध्येयाचें निशाण मिरवण्याकरितां किंवा त्याच्यासाठीं लढण्याकरितां नसून आलिंगन देणें व घेणें हाच आहे अशी आजच्या लोकप्रिय वाङ्मयावरून एखाद्याची समजूत झाली तर तो सारा दोष त्याच्या विकृत दृष्टीचाच आहे असें म्हणतां येईल काय? विषय कोणताही असो, तत्त्वप्रतिपादनाच्या आणि कलेच्या दृष्टीनेंच त्याची सजावट करावयाची या गोष्टीकडे आमच्या प्रतिभावंतांचें अधिक अधिक दुर्लक्ष

होत चाललें आहे. कुठलाही रस उत्कटत्वानें निर्माण झाला कीं तो वाचकांच्या मनाची पकड घेऊं शकतो हें जणुं कांहीं त्यांना पटतच नाहीं ! कृत्रिम कां होईना, पण कामकथा ही प्रत्येक कादंबरींत पाहिजेच. आपल्या कथेंतल्या नायकनायिकांचें मनोविश्लेषण करण्याऐवजीं त्यांच्या शरीरसौष्ठवाचीं सविस्तर वर्णनें करण्याचाच मोह आमच्या लेखकांना पदोपदीं कां होतो ? आजचे होतकरू लेखक अहमहमिकेनें ज्यांचें अनुकरण करीत आहेत, त्या फडके—माडखोलकरांच्या सारख्या श्रेष्ठ साहित्यिकांच्या कृतीसुद्धां या कलाहीन अतिरेकापासून अलिप्त नाहींत. 'कांता' ही माडखोलकरांची सुप्रसिद्ध कादंबरी पहा. कलेच्या दृष्टीनें पाहिलें तर कांता ही त्या कादंबरीची नायिका नाहीं आणि प्रियदर्शन हा तिचा नायकही नाहीं. त्या कादंबरीचा नायक 'सर महादेव ठाकूर' ही प्रभावशाली व्यक्ति आहे आणि तिची नायिका 'श्यामा' ही तेजस्वी तरुणी आहे. या दृष्टीनें त्या कादंबरींतल्या कथाप्रवाहांची गुंफण झाली असती तर ती वाचून संपविल्यावर सुद्धां, आपण विजेचा चमचमाट पाहत आहों असेंच वाचकाला वाटत राहिलें असतें. पण हेतु, भूमिका व प्रसंग यांचें केंद्रीकरण करण्याची कलात्मक दक्षता तर माडखोलकरांनीं घेतली नाहींच ! उलट, एवढ्या प्रभावशाली लेखकानें कादंबरीचा आरंभ करतांना वाचकवर्गाला शृंगारिक वर्णनाचे दोन घोट पाजण्याची जी काळजी घेतली आहे ती पाहण्यासारखी आहे !

'कांते'च्या पहिल्याच प्रकरणांत नागपूरचे डी. एस. पी. यादवराव आपल्या ऑफिसांत बसले असतांना त्यांची मुलगी विजया घाईघाईनें आंत येते. ती वडिलांच्याकडे गाडी मागायला आलेली असते. खरें पाहिलें तर आंत आल्याबरोबर तिनें आपली ही मागणी पुढें करायची ! पण तसें झालें असतें तर वाचकांच्या डोळ्यांपुढें एका तरुणीची मोहक आकृति मूर्तिमंत उभी करण्याची ही संधि लेखकानें सुखासुखी गमावल्यासारखें झालें असतें. म्हणून माडखोलकर वर्णनाला सुरवात करतात—' त्यांनीं कौतुकानें तिच्या कमनीय आकृतीकडे पाहिलें !' वडिलांना कमनीय वाटणाऱ्या मुलीच्या या आकृतीचें चित्र लेखकानें मोठें रेखीव काढलें असून त्याचा शेवट खालील वाक्यानें केला आहे—' नाहीं म्हणायला, आपल्या उन्नत वक्षःस्थलावर मांड,

आकाराच्या बाबतींत उरोजाशीं स्पर्धा करणारें, गुलाबाचें टपोरें फूल तिनें खोवलें होतें.' हें वर्णन संपतांच सामान्य वाचक मनांत म्हणतो—आतां तरी बापलेकींचें संभाषण सुरू होईल. पण छे! सुंदर तरुणी समोर असतांना कुणालाही बोलणें सुचणें शक्य आहे का? मग तो तिचा बाप का असेना! यामुळें माडखोलकरांना पुन्हां वर्णन करण्याशिवाय गत्यंतर उरत नाहीं. 'यादवराव सारखे तिच्याकडे बघत होते. तिच्या फ्रॉकवरील तो श्वासोच्छ्वासागणिक वर खालीं होणारा गुलाब, त्याला आपल्या कांतीनें लाजविणाऱ्या तिच्या रेखीव जिवणीभोंवतीं उमललेलें निर्भर हास्य, खोलींतील प्रत्येक वस्तूवर दृष्टिक्षेप करीत असलेल्या तिच्या चंचल नेत्रांतील स्फटिकाची लकाकी किंवा त्या मर्दानी पोषाखामुळें खुलून दिसणारी तिच्या सडपातळ बांध्याची मोहक सुस्पष्टता—यापैकीं कोणत्या गोष्टीनें त्यांना मुग्ध केलें होतें कोण जाणे!' कोण जाणे हेंच खरें! कारण देव जाणे असें म्हणण्याइतकी कांहीं ही गूढ गोष्ट नाहीं!

'मुखवटे' या त्यांच्या राजकारणप्रधान कादंबरींतल्या पहिल्या प्रकरणांत हीच गंमत पुन्हां दिसते. कादंबरीच्या नायकाला बाजूला ठेवून माडखोलकर गांधीजींच्या आश्रमांत कथेला जी सुरवात करतात ती मोहन व रोज या दुय्यम दर्जाच्या पात्रांवर! आणि अवघ्या दहा पृष्ठांत भाविकपणानें गांधींचें दर्शन घ्यायला वर्ध्याला गेलेल्या रोजला ते एका नदीच्या कांठावर आणतात. तिथें तिचा पाय घसरून ती कातळावर आपटते—आणि मग—

मग काय? रोज एकटी असती तर तिला दवाखान्याचाच रस्ता सुधारावा लागला असता! पण आजकालचा कुठला लेखक नायिकेला अशी एकटी आपटूं देण्याइतका निष्काळजी अथवा कठोर आहे? इथें रोजबरोबर मोहन आहेच कीं!

लेखक पुढें वर्णन करतात 'जोरानें आदळल्यामुळें अंग अवघडल्यासारखें होऊन तिला चटकन् उठतां येईना; शिवाय कदाचित् आपण पुन्हां पडूं अशीहि भीति तिला वाटली.

तेव्हां त्यानें तिचे दोन्ही दंड घट्ट धरून तिला अलगत उठवून उभी केली—

आणि तिच्या श्वासकंपित ओंठावर झटकन् आपले ओंठ टेकून तिला हृदयाशीं धरलें '.

चिवडयाला जशी काजूबियांशिवाय लज्जत नाहीं, त्याप्रमाणें असल्या वर्णनांवांचून कादंबरीला गोडी नाहीं, अशी माडखोलकरांसारख्या अव्वल दर्जाच्या साहित्यिकानें आपली समजूत करून घ्यावी हें कशाचें लक्षण आहे ? अभिजात वाङ्मयांतच असें स्थानीं अस्थानीं वैषयिक वातावरण निर्माण होऊं लागल्यावर दर आठवड्याला वाचकांना कांहींतरी गरमागरम खाद्य पुरविण्याचें दुकान काढणाऱ्यांनीं कामविकृतींचें स्फुट–अस्फुट दर्शन हेंच आपलें प्रमुख आकर्षण केलें तर त्यांत दोष कुणाचा ?

मी माडखोलकरांच्याच कादंबऱ्यांतलीं उदाहरणें दिलीं याचें कारण ते जेवढे लोकप्रिय लेखक आहेत तेवढेच माझे निकटचे स्नेही आहेत. माझ्या टीकेमुळें ते स्वप्नांतही गैरसमज करून घेणार नाहींत. पण उदाहरणें माड-खोलकरांचीं असलीं तरी वैषयिक वातावरणाचा हा ओढा त्यांच्याच कादं-बऱ्यांत दिसून येतो असें मुळींच नाहीं. आजारी माणसाला आपल्या आजाराशिवाय बोलायला जसा दुसरा विषयच सुचत नाहीं, त्याप्रमाणें कॉलेजांतल्या तरुण होतकरू लेखकापासून पन्नाशीच्या घरात आलेल्या प्रौढ प्रथितयश साहित्यिकापर्यंत प्रत्येकाची प्रतिभा आजकाल असल्या प्रेमा-भोंवतींच पिंगा घालीत असलेली दिसते !

आणि सर्वांत मौजेची गोष्ट ही कीं हीं बहुतेक तथाकथित प्रेमचित्रें अंधुक, कल्पनारम्य, आणि थोडींफार विकृत असतात. गेल्या दहा वर्षांतल्या मराठींतल्या सर्व प्रेमकथा वाचल्या तरी मध्यम वर्गांतल्या तरुण–तरुणींच्या खऱ्याखुऱ्या प्रेमविषयक अनुभवांवर फारसा प्रकाश पडणार नाहीं.

कुठल्याही दुकानांत गेलें तरी आईस्क्रीमची चव जशी एकच असायची, कांहीं थोडा फरक असला तर तो आईस्क्रीम कमी अधिक घट्ट असण्यांत असायचा, तशीच आमच्या विविध कथांतील प्रेमाची स्थिति झाली आहे. त्यांत वैचित्र्य नाहीं, उत्कटता नाहीं, आर्तता नाहीं आणि प्रणयचित्राचें सौंदर्य वाढविणारी मुग्धमधुर सूचकता किंवा तरल कल्पकता तर नाहींच नाहीं ! हार्डीच्या कादंबऱ्यांतील प्रेमाचें रुद्र, आर्त किंवा उत्कट कलात्मक स्वरूप

आमच्या कितीशा कादंबऱ्यांत पहायला मिळतें ? स्टीफन झ्वाइगच्या ' एका अनामिकेचें पत्र ' या कलापूर्ण कथेंत नीतिबाह्य पण भावमधुर प्रीतीचें जें हृदय-स्पर्शी चित्रण आढळतें, त्याच्या शेजारीं अभिमानानें उभीं राहूं शकतील अशीं प्रणयचित्रें आमच्या लेखकांनीं कितीशीं काढलीं आहेत ?

मनामध्यें अशी तुलना सुरू झाली कीं एका गोष्टीची खात्री पटते— प्रीतीचे विविध रंग हा पाश्चात्य लेखकांचा आणि वाचकांचा अनुभूतीचा विषय आहे. आमच्याकडे तो अनुकरणाचा, कुतूहलाचा, व्यवहारदृष्ट्या अतृप्तीचा आणि म्हणूनच विकृतीचा विषय झाला आहे. प्रेमकथा म्हणचे कामकथा असा संकेत आमच्या वाङ्मयांत पडूं पहात आहे. सजीव प्रेमकथा लिहायला लागणारे अनुभव आमच्या समाजांत दुर्मिळ आहेत. इतकेंच नव्हे, तर अशा प्रकारचे अनुभव कलापूर्ण रीतीनें रेखाटायला जी काव्या-त्मता आणि सत्यनिष्ठा लागते, त्यांचाही विकास अद्यापि आमच्या लेखकांत पूर्ण झालेला नाहीं. सांकेतिक नीति, संस्कृति, परिस्थिति, इत्यादिकांनीं चौफेर वेढलेल्या मध्यम वर्गाच्या घरांतील प्रीति ही कल्पलता होऊं शकत नाहीं ती कुंडींतली वेल आहे ! कल्पक अथवा काव्यात्म प्रतिभेच्या लेखकाला तिच्यापासून कसली स्फूर्ति मिळणार ? समुद्राचें विराट् स्वरूप जसें वादळांत प्रतीत होतें, त्याप्रमाणें प्रीतीचें विशाल आणि विलक्षण रूपही जीवनसागरांतलीं वादळें जिथें नित्य सुरू असतात अशा बहुजन—समाजांतच प्रगट होतें. पण अशा गोष्टी आमच्या मराठी लेखकांना अद्यापि दिसतच नाहींत. चुकून दिसल्याच तर त्या रंगवितां येत नाहींत. उदाहरण म्हणून मी अद्यापि ज्यांचा उपयोग करूं शकलों नाहीं अशा अनेक रम्य पण विलक्षण प्रेमकथां-पैकीं एकच इथें सांगतों.

एका सामान्य माणसानें ठेवलेल्या सामान्य बाईची गोष्ट आहे ही ! मित्रांना दिलेला पैसा परत न आल्यामुळें त्या माणसाचें दिवाळें वाजतें. तो अन्नाला मोताद होतो. आत्महत्येचे विचार त्याच्या मनांत घोळूं लागतात. ही दुर्दशा त्या बाईला पाहावत नाहीं. तो सुखी व्हावा म्हणून ती एक विलक्षण त्याग करते. ती दुसऱ्या मनुष्यापाशीं राहण्याचा निश्चय करते. तिचा प्रियकर डोळ्यांत अश्रु आणून तिला म्हणतो, ' तूं तरी मला सोडून जाऊं नकोस.' आपण त्याच्यापाशीं राहणें म्हणजे त्याच्या अगतिक जीव-

नाला भारभूत होण्यासारखें आहे अशी तिची खात्री झालेली असते. ती त्याला उत्तर देते, ‘ माझं प्रेम तुझ्या पैशावर होतं. तुझ्यावर नव्हतं ! ’ हें विलक्षण उत्तर ऐकून तिचा प्रियकर दुःखित मनानें निघून जातो. पण तो अन्नाला महाग होत नाहीं ! त्याच्या नांवानें दरमहा नियमितपणें पैसे येऊं लागतात. हे पैसे पाठविणाराचें नांव कळावें म्हणून तो खूप खटपट करतो. पण त्याला तें कधींच कळत नाहीं.

या कथेंतली नायिका एक रखेली आहे. इतकेंच नव्हे तर ती एका पुरुषाला सोडून दुसऱ्यापाशीं रहायला तयार झालेली बाई आहे. पण असें असून या गोष्टीचें वातावरण वैषयिक वाटतें काय ? कथेंत रंग भरण्याकरिता कुणाही लेखकाला या बाईच्या सौंदर्याचें साग्रसंगीत वर्णन करण्याची जरूरी भासणार नाहीं. पण आमच्यांतले अस्सल कलावादी सुद्धां असल्या कथानकांना स्पर्श करायला धजणार नाहींत. समाजाच्या सांकेतिक नीतीच्या चौकटींत कसेंबसें बसणारें कृत्रिम प्रीतिचित्रच रंगविण्याचा ते प्रयत्न करतील आणि मग तें निर्जीव वाटूं नये म्हणून शृंगाराचे गहिरे रंग त्यांत काठोकाठ भरतील.

आमच्यांत प्रेमाचे भाट आहेत; पण प्रेमाचे पोवाडे मात्र नाहींत ! प्रीतीची पूजा आहे; पण तिची मूर्ति नाहीं. प्रीतीच्या उदात्त, उत्कट, उच्छृंखल किंवा उत्साही स्वरूपाच्या अगणित छटांचें आम्हांला अद्यापि आकलनच करतां येत नाहीं. याचा परिणाम म्हणजे आमचें आजचें नकली प्रेमवाङ्मय. उत्कट प्रीतीचें चित्रण हें सुंदर मनोविश्लेषण असतें; नुसतें सौष्ठवप्रदर्शन किंवा विकाराचित्रण नसतें. पण हें न कळल्यामुळें किंवा कळूनही न वळल्यामुळें वाचकांची किंवा प्रेक्षकांची सुप्त कामुकता चाळवणारीं वर्णनें करून आणि उद्दीपक प्रसंग रंगवून प्रेमकथा लिहिल्याचें समाधान आम्ही मानीत आहों. हें समाधान नुसतें दुबळें नाहीं; तें आंधळेंही आहे.

असल्याच आत्मवंचनेचें एक उत्कृष्ट उदाहरण श्री. क्षीरसागर यांच्या ‘ राक्षसविवाह ’ या भावकथेंत आढळेल. राक्षसविवाह या नांवावरून लहान मुलांकरतां लिहिलेली ही एखादी अद्भुत कथा असावी असा अनेकांना भास झाला असेल. पण ही कथा अद्भुत तर नाहींच; उलट घरोघर घडणारी

आहे ! पूर्व परिचयावांचून झालेलें लग्न हा शुद्ध राक्षसविवाह असतो असा क्षीरसागरांचा ठाम सिद्धात आहे ! ते म्हणतात 'बाजारी वधूपरीक्षा, वर-पक्षाची जेत्याची भूमिका व अपरिचित वराला एका दिवसात शरीरार्पण त्यामुळेंच मला रूढ विवाह राक्षसविवाह वाटतो.' क्षीरसागरांचें हें वाक्य वाचल्यावर आपण राक्षस आहों हें कळून चुकल्यामुळें हजारों मराठी वाच-कांची माझ्याप्रमाणेंच मोठी त्रेधा उडाली असेल. पूर्ण परिचयानंतर होणारा प्रेमविवाह हा आपल्याकडे अद्यापि नियम नसून अपवाद आहे. त्यामुळें आपले बहुतेकांचे विवाह क्षीरसागरांच्या दृष्टीनें तरी राक्षसविवाहातच जमा आहेत. आपल्यापैकीं एकाद्याची पत्नी पतीला देव मानीत असेल आणि एखादा पति आपल्या पत्नीला देवता म्हणत असेल, निदान शेंकडा सत्तरऐंशीं जोडपीं तरी एकमेकांकडे आपलें जिवाभावाचें माणूस या दृष्टीनें पाहत असतील; पण क्षीरसागरांच्या दृष्टीनें आपण सर्व माणसें होऊं शकत नाहीं ! आपण राक्षस आहोंत !

केवढा विलक्षण शोध आहे हा ! मराठींतला एक पहिल्या दर्जाचा टीकाकार जीवनांतल्या अत्यंत नाजुक अनुभवाविषयीं असलें तर्कदुष्ट आणि अर्थशून्य विधान कां करतो—नव्हे त्या विधानाचा विस्तार करणारी भावकथा कां लिहितो ? याचें उत्तर एकच आहे ! आमच्या आजच्या विकृत वाङ्मयीन कल्पना—आजचा आमचा दूषित आणि संकुचित असा सामाजिक दृष्टिकोन.

कथेंतल्या नायकाचें यमूवर प्रेम आहे. तिच्याशीं लग्न व्हावें अशी त्याच्या अंतर्मनाची अपेक्षा आहे ! पण ही इच्छा स्वतःशीं कबूल करण्याइतका सुद्धां तो प्रामाणिक नाहीं ! त्यामुळें लग्न झाल्यावर यमू दुसऱ्या माणसाची झाली, तिच्या गोऱ्यापान कपाळावरील काळ्याभोर दाट फुगीर केसांना कुणी तरी दुसऱ्या मनुष्यानें स्पर्श केला, या कल्पनेनेंच तो वेडावून जातो ! मनांत उत्पन्न झालेल्या या विकृत मत्सरानें अंध होऊन हा दुबळा जीव यमू आणि तिचा पति यांच्या जीवनाकडे पाहूं लागतो. स्वतःच्या विकृतींत रममाण होणाऱ्या माणसाची चीड पराकोटीला पोंचली तरी दुसरें काय करणार ? यमूचा विवाह हा राक्षसविवाह आहे असा आक्रोश करून हा भ्याड आत्म-वंचक नायक समाजावर सूड उगविल्याचें समाधान मानून घेतो !

आपल्या या नायकाची कहाणी सांगून क्षीरसागर स्वस्थ बसले असते तर सध्यांच्या सामाजिक कोंडमाऱ्यांत सांपडलेल्या एका दुबळ्या मनोवृत्तीच्या तरुणाचें आत्मनिवेदन म्हणून वाचकांनीं या कथेकडे पाहिलें असतें. पण क्षीरसागरांनीं या विकृत कथेला तत्त्वज्ञानाचा मुलामा दिला आहे, एरवीं जिचा सहज पत्ता लागला असता अशा पितळेचें त्यांनीं सोनें बनवण्याचा प्रयत्न केला आहे. 'अपरिचित वराला एका दिवसांत शरीरार्पण' या शब्दांनीं ज्या प्रसंगाचा ते उल्लेख करतात त्याची पुसट कल्पनासुद्धां सर्व-सामान्य वधूला किती आनंददायक असते याचा विचार त्यांनीं कधीं केला आहे काय ?

आपल्या दृष्टिकोनांतला हा विकृत अतिरेक लक्षांत आल्यावर लग्न ही एक आवश्यक शस्त्रक्रिया आहे अशी पुरवणी मूळ तत्त्वज्ञानाला जोडण्याची सावधगिरी क्षीरसागरांनीं घेतली आहे. शस्त्रक्रिया हा शब्द लेखकाला राक्षसा-पेक्षां कमी भयंकर वाटला असेल. पण सामान्य मनुष्य मात्र त्यानेंच अधिक घाबरून जाईल ! राक्षस काल्पनिक असले तरी शस्त्रक्रिया ही खरीखुरी आहे अशी त्याची खात्री झालेली असते. अपरिचित पतीला राक्षस म्हटलें काय किंवा लग्नाला शस्त्रक्रिया म्हटलें काय, त्यामुळें विचारांतली विकृति लोप पावूं शकत नाहीं. सर्वसामान्य स्त्री-पुरुषांना येणाऱ्या अनुभवाशीं मुळींच न जुळणारी कुठलीही विकृत गोष्ट काव्यांत तळली नि तत्त्वज्ञानांत घोळली म्हणून का ती सत्य आणि सुंदर वाटणार आहे ?

क्षीरसागरांची ही एकच गोष्ट नव्हे, तर अनेक लोकप्रिय मराठी कथा वाचतांना किंवा पाहतांना सामान्य वाचक मनांत म्हणत असतो—विकृत आणि अपवादात्मक जीवनाचें चित्रण करण्याचाच आमच्या लेखकांनीं विडा उचलला आहे कीं काय ? जे अनुभव मला किंवा माझ्यासारख्या लक्षावधि लोकांना जागेपणींच काय पण स्वप्नांतसुद्धां येत नाहींत, ते यांच्या कथांत कसे अगदीं ठांसून भरलेले असतात ! समाजचित्रें-पुरोगामी कथा-विचार-प्रवर्तक गोष्टी या नांवाखालीं आरबी भाषेंतल्या सुरस आणि चमत्कारिक गोष्टींच्या आधुनिक आवृत्त्याच आम्हीं अजूनही वाचीत बसायचें कीं काय ?'

'लग्नाची बेडी' हें अत्र्यांचें लोकप्रिय नाटकच घ्या ! मुंबईच्या

चौपाटीवर एखाद्या डॉक्टराला सिनेमा नटी भेटणें हीं कांहीं अगदीं अशक्य गोष्ट नाहीं. पण भेटणें आणि भाळणें यांच्यांत जमीन अस्मानाचें अंतर आहे ! सामान्य डॉक्टरावर सिनेमा नटीचें अगदीं पहिल्या भेटींत प्रेम बसणें शक्य असलें, तर प्रॅक्टिस न चालणारे पुष्कळ डॉक्टर सिनेमा नटींच्या करितां मोफत दवाखाने उघडूं लागतील ! सामान्य मनुष्याला बायकोचा थोडा कंटाळा यायला निदान पांच दहा वर्षे तरी तिच्या सहवासांत काढावीं लागतात. पण या नाटकांतला डॉक्टर एकाच वर्षांत आपल्या बायकोला कंटाळलेला दिसतो ! आपल्यापेक्षां वयानें मोठ्या असलेल्या एखाद्या कुरूप बाईशीं लग्न करण्याची घोडचूक त्यानें केली होती म्हणावें तर तसेंही नाहीं ! डॉक्टर आणि नटी यांचें सूत जमल्यावर ती नटी पुण्याला त्याच्या घरावर हवाई हल्ला चढवून तिथें एका दिवसांत शक्य तेवढा धुडगूस घालते, त्याच्या बायकोला जीव अगदीं नकोसा करते आणि शेवटीं अर्धांगाप्रमाणें वैराग्याचा अचानक झटका येऊनच कीं काय ‘ नवऱ्याला सांभाळण्याकरितां बायकोनं आपल्या शृंगाराची काळजी घेतली पाहिजे ’ असा साळसूद उपदेश करून निघून जाते ! हें सारें गौडबंगाल काय आहे हेंच आपल्याला कळत नाहीं !

सर्वसामान्य वाचकाची ही तक्रार ललित वाङ्मयाच्या एकाच भागाविषयीं किंवा एकाच लेखकाविषयीं आहे असें मुळींच नाहीं. आजच्या मराठी कथेंत—मग त्या कथेचें तांत्रिक स्वरूप लघुकथा, कादंबरी, नाटक किंवा बोलपट यांच्यापैकीं कोणतेंही असो—जें व्यक्तिजीवन आणि समाजजीवन रंगविलें जात आहे, त्यांतला फारच थोडा भाग त्याला जिव्हाळ्याचा आणि स्वतःच्या अनुभवाशीं जुळता असा वाटतो. स्त्रीच्या आर्थिक स्वातंत्र्याचा प्रश्न आजच्या मध्यम वर्गाच्या पुढें दत्त म्हणून उभा आहे. पण प्रो. फडके त्याचें ‘उद्धार’ या कादंबरींत जें चित्रण करतात, तें पाहून सामान्य वाचक बुचकळ्यांत पडतो ! त्याच्या दृष्टीनें या प्रश्नाला अनेक बाजू आहेत. पति आणि पत्नी या दोघांना नोकरी मिळणें शक्य आहे काय ? तें शक्य असलें तरी दोघेंही नोकरी करूं लागल्यास घराचें घरपण लोप पावेल कीं काय ? संध्याकाळीं दमून भागून घरीं येणाऱ्या नवऱ्याला दारांत उभी असलेली हंसतमुख पत्नी पाहून आनंद होईल कीं आपल्याहूनही कोमेजून गेलेली बायको पाहून पहिल्या तारखेचें स्मरण करीत तो तें दुःख विसरून जाईल ? दोन तीन

मुलें झाल्यावर तीं सांभाळून एखादी नोकरी करणें मध्यम स्थितींतल्या स्त्रीला शक्य आहे काय ? आणि तें शक्य असलें तरी इष्ट आहे काय ? बरें, तें इष्ट नाहीं असें मानलें तर आजच्या काळांतली सामान्य पुरुषाची महिन्याची मिळकत कुटुंबाला सुखांत ठेवायला पुरी कशी पडणार ? खालच्या वर्गांतली स्त्री ही पुरुषाच्या बरोबरीनें काम करते, प्रसंगीं संसाराचा सर्व भरिभार अंगावर घेऊं शकते. त्या स्त्रीशीं तुलना केली म्हणजे आजची मध्यम वर्गांतली स्त्री ही नुसती बुद्धिवान् बाहुली वाटते. आर्थिक स्वातंत्र्य हा या बाहुलीला सजीव करणारा मांत्रिक होऊं शकेल काय ?

हे किंवा असले अनेक प्रश्न चुकीचे असतील, त्यांच्या आंत लपलेल्या भावना भोळ्याभाबड्या असतील ! पण त्या आजच्या मध्यम वर्गाच्या खऱ्याखुऱ्या भावना आहेत. सर्वसामान्य स्त्रीपुरुषांच्या मनापुढें पदोपदीं उभे राहणारे हे प्रश्न आहेत !

या प्रश्नांचीं उत्तरें फडके आपल्या कादंबरींत देतील या अपेक्षेनें सामान्य मनुष्य ‘ उद्धार ’ च्या विषयाकडे पाहतो. पण स्वप्नांतल्या विचित्र भासामुळें आपण गरोदर झालों आहों असें वाटणारी विद्या वाचकांच्यापुढें उभी करून कादंबरीकार आपल्या कथानकाचा कळस रचतात आणि नैतिक स्वातंत्र्य मिळाल्याशिवाय नुसत्या आर्थिक स्वातंत्र्यानें स्त्री सुखी होणार नाहीं असें वाचकांना बजावतात.

सर्वसामान्य वाचक हा सिद्धांत पाहून मनांत गोंधळून जातो. त्याला वाटतें—स्त्रीचें नैतिक स्वातंत्र्य हा अत्यंत महत्त्वाचा विषय असेल. सिंक्लेअर लुईसारख्या अमेरिकन कादंबरीकारानें तो जिव्हाळ्यानें रंगविण्याइतकें त्याला तिकडे महत्त्वही असेल. पण महाराष्ट्रीय स्त्रीच्या आर्थिक स्वातंत्र्याच्या आजच्या प्रश्नाशीं त्याचा इतका निकटचा संबंध कुठें आहे हें मात्र कांहीं केल्या त्याला कळत नाहीं. तो म्हणतो—स्त्री ही नैतिकदृष्ट्या स्वतंत्र असलीच पाहिजे असें प्रो. फडके यांना प्रतिपादन करावयाचें असेल तर ‘The woman who did’ या कादंबरींतल्या नायिकेप्रमाणें लग्नबंधन न स्वीकारणारी नायिका त्यांनीं खुशाल निर्माण करायची होती ! पण जायच एका गांवाला नि तिकीट काढायचं दुसऱ्याच गांवाचें असें हे कलावंत कां करतात ?

इतर अनेक कथा वाचतांनाही सामान्य वाचकाची अशीच तारांबळ उडते. खांडेकरांच्या ‘ दोन ध्रुव ’ सारख्या कादंबऱ्या वाचल्यावर वाचक आपल्या भोंवतालच्या माणसाकडे संशयित दृष्टीनेंच पाहूं लागतो. त्याच्या मनात येतें, ‘दोन ध्रुवांतली’ काजूच्या कारखान्यांत काम करणारी वत्सला ही जशी एका बड्या लेखकाची बायको निघाली तशी आपल्या घरांतली भांडीं घासणारी मोलकरीणही एखाद्या मोठ्या चित्रकाराची आई ठरायची! नाहीं कुणी म्हणावें ? ती उत्तर हिंदुस्थानांतली एखादी गायिका सुद्धां नसेल कशावरून ? माडखोलकरांचें ‘ दुहेरी जीवन ’ वाचून तो म्हणतो—मनाचें समाधान मिळावें म्हणून लोक जसे निरनिराळ्या धर्मांतले ग्रंथ वाचतात, त्याप्रमाणें निरनिराळ्या जातीच्या स्त्रियांशीं संबंध आल्यावांचून आयुष्य पूर्ण होतच नाहीं असें या बुद्धिवान् मुकुंदाला वाटत होतें कीं काय ? कीं त्याची ही एक मानसिक विकृति होती ? आपल्या ओळखीच्या सर्व माणसांचीं चरित्रें तो आठवून पाहतो आणि शेवटीं ‘ कल्पित कथा ही सत्याहून अद्भुत असते ’ हें त्याला कबूल करावें लागतें.

सामान्य वाचकांच्या या प्रकारच्या टीकेंत सत्याचा बराच मोठा अंश आहे. ललित वाङ्मय हें एक प्रकारचें मोहक स्वप्न आहे. पण तें जागेपणींचें स्वप्न आहे तें झोंपेंत पडलेलें स्वप्न नव्हे आणि कुठल्याही प्रकारच्या अजीर्णामुळें पडलेलें स्वप्न तर नव्हेच नव्हे ! उत्कृष्ट वाङ्मय हें जीवनाचें छायाचित्र असूं शकत नाहीं. पण तें जीवनाचें कल्पकतापूर्ण चित्र वाटावें इतकें तरी जीवनांत आणि वाङ्मयांतल्या चित्रणांत साम्य असायला हवें ना ? सामान्य मराठी वाचक आपल्या किंवा आपल्यासारख्या हजारों लोकांचें आयुष्य जेव्हां बारकाईनें पाहूं लागतो तेव्हां त्यांतलीं बहुतेक दुःखें व सुखें आर्थिक आणि भावनात्मक आहेत असें त्याला आढळून येतें. पण याच आयुष्यांतल्या वेंचक प्रसंगांचें चित्रण म्हणून तो नामांकित लेखकांच्या कृती वाचूं लागला कीं त्याचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसत नाहीं.

त्याला या सर्व कथांत मोहक कला आढळते, सुंदर चमत्कृति दिसते, घटकाभर तो स्वतःला विसरून सुद्धां जातो. पण अनेक प्रश्न राहून राहून त्याच्या मनापुढें उभे राहत असतात—अतिरंजनाशिवाय रंजन होऊंच शकत

नाहीं काय? विकृतीशिवाय कलाकृतीचें सौंदर्य वाढतच नाहीं काय? संकुचित किंवा विकृत अशा आत्मनिष्ठ प्रचीतींतून भव्य निर्मिति कशी होऊं शकेल? सर्व सामान्य माणसें जशीं वागतात, जसा संसार करतात, जशीं जगाशीं समरस होतात, जशीं आयुष्यांतल्या सुखदुःखाशीं खेळतात, आणि जशीं एखाद्या ध्येया-साठीं थोडीफार धडपड करतात तशीं माणसें आजकालच्या कथाकादंबऱ्यांत विपुलतेनें कां आढळत नाहींत? साध्यासुध्या माणसांचीं सुंदर चित्रं रेखाटा-यचें सोडून हे कलावंत त्यांचीं व्यंगचित्रें किंवा भडक रंगांनीं रंगवलेलीं चित्रेंच कां काढीत बसले आहेत? वाङ्मयाच्या बहिरंगाकडे पाहिलें तर पूर्वीच्या चांदीच्या भांड्याऐवजीं आज सोन्याचीं भांडीं आलीं आहेत. या सोन्याच्या भांड्यांतून अमृत प्यायला मिळेल अशी आमची कल्पना होती. पण अमृत दूरच राहिलें! पूर्वी चांदीच्या भांड्यांतून मिळणारें निर्मळ पाणीही आतां मिळेनासें झालें आहे. या सोन्याच्या सुंदर भांड्यांत कसल्या चित्रविचित्र पेयांचें मिश्रण आजकाल केलें जात आहे! उन्माद आणि उद्बोध यांचा संगम साधणें या थोर लेखकांना सर्वस्वीं अशक्य आहे काय?

त्याच्या या सर्व प्रश्नांचें उत्तर एकच आहे— सध्यांचा काल हा संक्रमण-काल आहे. या कालानें आमच्या कलाकारांची बुद्धि, कल्पना आणि भावना यांचा संगम करण्याऐवजीं संकर केला आहे. जगाच्या जीवनप्रवा-हाला पदोपदीं विलक्षण वळणें मिळत असल्यामुळें विचारांच्या प्रत्येक क्षेत्रांत नवे नवे भयंकर भोंवरे उत्पन्न होत आहेत. या भोंवऱ्यांत आमचे ललित साहित्यिक आज सांपडले आहेत.

हे सर्व लेखक मध्यम वर्गांतूनच पुढें आले आहेत आणि मध्यम वर्गाच्या पद्धतीनेंच त्यांची जीवनयात्रा सुरू आहे. लहानाचे मोठे होत असतांना श्रमजीवी वर्गापेक्षां संपन्न वर्गाचाच आदर्श त्यांच्या डोळ्यांपुढें उभा होता. झाडाची वाढ त्याला मिळणाऱ्या खताच्या प्रकारावर थोडीफार अवलंबून असतेच असते! वाङ्मयनिर्मितीला आवश्यक असलेल्या व्यक्तित्वाचेंही तसेंच आहे. आमच्या आजच्या लेखकांच्या प्रतिभेवर जे जे सामाजिक किंवा वाङ्मयीन संस्कार झाले आहेत ते जवळ जवळ एका पिढीपूर्वीच्या कला, नीति, संस्कृति, समाजरचना इत्यादिकांच्या कल्पनांचे आहेत. समुद्रांतली

वाळू जशी कणाकणानें पायाखालून जाते, त्याप्रमाणें सर्व सामाजिक कल्पना व मूल्यें पूर्वीप्रमाणें हळूहळू बदलत राहिलीं असतीं तर आमच्या लेखकांच्या आजच्या कलाकृतींत इतका विसंगतपणा किंवा विलक्षणपणा आढळला नसता. पण अवघ्या पंचवीस वर्षांत जग दोन महायुद्धांच्या फेऱ्यांत सांपडलें. दोन तपांत काळ दोन शतकें धांवून गेला. विद्युद्वेगानें धांवणारा हा काळ आमच्या लेखकांना फरफटत आपल्या मागून ओढून नेत आहे. पण त्यांचीं मनें मात्र आजून मागच्या काळांतच रेंगाळत आहेत. लेखनकला ज्या रसानें आपलीं चित्रें रंगविते, तो मानवी अंतःकरणाच्या सुखदुःखांतूनच उत्पन्न होत असला तरी आपलें जीवन आतां पूर्वीइतकें व्यक्तिनिष्ठ राहिलें नाहीं या कल्पनेचें आमच्या कलाकारांना अजून पूर्ण आकलनच करता येत नाहीं. समुद्राच्या अफाट विस्ताराला भिऊन नदी कधीं मागें फिरली आहे का? काळाच्या प्रवाहाशीं कलावन्तानेंही तसेंच समरस झालें पाहिजे. ही समरसता आमच्या आजच्या लेखकांत स्पष्टपणें दिसत नाहीं इतकेंच नव्हे तर नवीं सामाजिक मूल्यें व जुनीं वैयक्तिक मूल्यें यांचा जो विलक्षण संग्राम सध्यां सुरू आहे, त्यांत आपण कुणाची बाजू घ्यावी याविषयींही ते साशंक आहेत. या साशंक वृत्तीचीं उदाहरणें सध्यांच्या वाङ्मयांत हवीं तेवढीं मिळतील. आजचे अग्रगण्य कादंबरीकार प्रो. फडके यांची ' इंद्रधनुष्य ' ही ताजी कादंबरी घ्या. या कथेंत एका तरुणीची प्रेमकथा त्यांना रंगवायची होती. पुरुषाचे प्रेम हें शरीरसुखानिरपेक्ष असावें ही त्या तरुणीची कल्पना किती चुकीची आहे यांचें चित्रण त्यांना करायचें होतें. पण हें चित्रण करतांना त्यांनीं तिला समाजसत्तावादावरलीं पुस्तकें वाचायला लावलें आहे आणि खेड्यापाड्यांतल्या गोरगरिबांविषयीं तिच्या अंतःकरणाला मधून मधून तळमळायलाहि लावलें आहे. तसें पाहिलें तर मानसशास्त्रांतल्या ज्या कोड्यावर त्यांनीं ही कादंबरी उभारली आहे, त्याचा या विशिष्ट पार्श्वभूमीशीं काय संबंध आहे? त्यांनीं सरळ नायिकेच्या या किंचित् विचित्र अशा प्रेमाची कथा लिहिली असती, तर या कथेमध्यें पुरोगामी असें कांहीं नाहीं असा कुणी तरी आक्षेप घेतला असता! बरें, या आक्षेपाला फडके इतके भितात म्हणावें तर ' उन्माद ' कादंबरींत मजुरांचा कैवार घेणारा नायक निर्माण करूनही ते प्रेम, प्रतिष्ठा व देशभक्ति या तिन्ही उन्मादांना एकाच पंक्तींत बसवितात!

फडक्यांच्यासारख्या चतुर कलावंतानें असें गोंधळांत कां पडावें ? मसाल्याकरितां जिऱ्यामिऱ्यापासून दगडफुलापर्यंत अनेक जिन्नस गोळा करणाऱ्या गृहिणीप्रमाणें आमच्या कथाकारांनीं प्रेम, गांधीवाद आणि मजुरांचा संप या सर्वांचें संमिश्र चित्रण करण्याचा अट्टाहास पदोपदीं कां करावा ? आपल्या भोंवतालचें जीवन प्रामाणिकपणें रंगविण्याची या कलावंतांना भीति कां वाटावी ? कुठें शृंगाराचा रंग उधळ, कुठें राजकारणाचा मुलामा दे असें केल्याशिवाय कथा मोहक होतच नाहीं अशी त्यांची समजूत कां व्हावी ?' Citadel ' या कादंबरींत एका डॉक्टराचें साधेंच आयुष्य क्रोनिननें किती हृदयंगम रीतीनें चित्रित केलें आहे ! त्यांत प्रेम आहे, ध्येय आहे, कटु व्यवहार आहे, सर्व कांहीं आहे, पण तें सर्व वास्तव आहे. सर्व सामान्य वाचकालासुद्धा आपले विचार, आपल्या भावना आणि आपले अनुभव यांचा साक्षात्कार या कादंबरींत झाल्यावांचून राहत नाहीं. आमच्या कलावंतांनीं डॉक्टर, वकील, शिक्षक, न्यायधीश पुष्कळ पाहिले असतील. पण त्यांचें अशा उत्कट प्रामाणिकपणानें साधें सुधें चित्रण करण्याची कल्पना त्यांना कधीं सुचली आहे काय ? 'Beware of Human Pity' या कादंबरींत झ्वाइग्नें एक विलक्षण विषय घेऊन त्याची किती नवीन दृष्टीनें मांडणी केली आहे ! ' दुबळी दया जगांत उपयोगाची नाहीं. ती एक प्रकारची मनाची विकृतिच ठरते, ' हें त्यानें या कादंबरींत काव्यपूर्ण रीतीनें विशद केलें आहे, कथानकाची उगीच गुंतागुंत न करतांही त्याची ओढ शेवटपर्यंत राहील अशी दक्षता त्यानें घेतली आहे आणि प्रत्येक भूमिकेच्या लहानसहान छटा इतक्या नाजूक कलमानें रंगविल्या आहेत कीं वाचकाला कशाचें कौतुक करावें नि कशाचें करूं नये हेंच कळेनासें होतें.

कलात्मक दृष्टीनें अशा तोलाच्या किंवा इतक्या वाङ्मयीन मोलाच्या ललितकथा आपल्याकडेही निर्माण होतील. पण त्याकरतां आमच्या लेखकांनीं जीवनाच्या संग्रामांत पराभूत झालेल्या आजच्या मध्यम वर्गाच्या दृष्टीनें जगाकडे पहायचें सोडून दिलें पाहिजे. आपली आजची कुचंबणा विसरण्याकरतां मध्यम वर्गाला उन्मादक आणि उथळ वाङ्मय हवें आहे. जें आयुष्यांत मिळत नाहीं तें कल्पनेनें मिळविण्यासाठीं त्याची धडपड चालली आहे. पराभूत मनुष्यानें कुठलीही पळवाट शोधावी यांत नवल तें काय ? क्षुद्र व क्षुल्लक विषयांवर वरचेवर

होणारें वर्तमानपत्री आकांडतांडव, कोण कुणाची टोपी अधिक उंच उड-
वितो या बाबतींत बुद्धिवंतांमध्यें लागलेली स्पर्धा, शृंगाराच्या नांवाखालीं
वाङ्मयांत शिरलेलीं कलाशून्य कामुक चित्रणें, हास्यरसांतला हास्यास्पद
उथळपणा या सर्व दोषांचें मूळ मध्यम वर्गाच्या या पराभूत मनोवृत्तींत आहे.
या वर्गांत अराजक माजलें आहे; पण तें बौद्धिक नसून भावनात्मक आहे.
व्यक्तिजीवनाच्या आणि समाजजीवनाच्या परंपरागत कल्पना बदलल्या-
शिवाय गत्यंतर नाहीं हें त्याला स्पष्ट दिसूं लागलें आहे. पण साप जशी कात
टाकतो, त्याप्रमाणें कुठल्याही वर्गाला मनांत दृढमूल झालेल्या आणि जीवनाला
सुखकारक वाटणाऱ्या कल्पना सुखासुखीं टाकून देतां येत नाहींत. या रस्सी-
खेचींत आमचे स्वतंत्र बुद्धीचे लेखक सुद्धां दिङ्मूढ होऊन जात आहेत !

उदाहरणार्थ य. गो. जोशी यांची 'प्रवासी' ही गोष्ट पहावी. या
गोष्टींतला 'मी' आगगाडींत भेटलेल्या एका भिकाऱ्याशीं सहानुभूतीनें
वागतो आणि त्याला जवळ बसवून चहा प्यायला देतो. पुढें गोष्ट या दृष्टीनें
कांहींच घडत नाहीं. पण त्या 'मी' नें आपल्या मनांतले जे विचारतरंग
सांगितले आहेत ते पाहण्यासारखे आहेत ! तो म्हणतो—

'आणि मग आमच्या डब्याला एक चर्चेला विषय मिळाला.

कुणी माझी चेष्टा करूं लागले. कुणाला माझ्या या सहानुभूतीचें कौतुक
वाटूं लागलें.

आणि मी मात्र मनांत विचार करूं लागलों कीं, 'मी जें त्या भिका-
ऱ्याशीं वागत होतों ती निर्भेळ दया होती का ?'

माझें मनच याला होकारार्थी उत्तर देऊं शकत नव्हतें.

आपण जी दया दाखवितों, ती अगदीं निर्हेतुक असते असें मला तरी
वाटत नाहीं.

ती दया भीतीच्या पोटीं उत्पन्न झालेली असते.

आज तो अडचणींत आहे—तो माणूस आहे—आपणही माणूसच आहोंत—
आज तो अन्नान्नदशेंत आहे—आपणही उद्यां कदाचित्—?'

अशा एका अस्पष्ट विचाराची भीति आपल्या मनाला कंप आणते—
आणि त्या कंपनानेंच आपला हात दातृत्वासाठीं आपल्या खिशाकडे वळतो !'

या गोष्टींतला ‘ मी ’ बुद्धिवान् आहे यांत शंकाच नाहीं. पण त्यानें उद्यांचा जो विचार केला आहे तो किती संकुचित दृष्टीनें ! त्याला वाटतें—जग हें असेंच चालायचें ! जगांत लाखों लोक असेच भिकारी रहायचे ! त्या अडाणी भिकाऱ्याइतकाच आजचा हा सुशिक्षित ‘ मी ’ ही दैववादी आहे. मानवी जीवन ही त्याच्या दृष्टीनें एक सोडत आहे ! या सोडतींत चौघांना मोठीं बक्षिसें मिळायचीं आणि चार हजारांनीं हात हलवीत बसायचें असें विधिलिखितच आहे !

पण तत्त्वज्ञानाचा आव आणणारा हा ‘मी’ सामाजिकदृष्ट्या अगदीं दुबळा आणि आंधळा वाटतो ! हाच दुबळेपणा साने गुरुजींच्या ‘सती’ या कादंबरींत निराळ्या स्वरूपांत आढळून येतो. या कादंबरीच्या प्रस्तावनेंत पुरुषत्वहीन पतीशीं दुर्दैवानें जखडल्या जाणाऱ्या स्त्रियांचें दुःख लेखकानें स्वतःला माहीत असलेल्या सत्यकथा देऊन वर्णन केलें आहे. पण त्यानें जी कथा लिहिली आहे, तिच्यांत मात्र अशाच प्रकारच्या एका तरुण स्त्रीची आपल्या म्हाताऱ्या नवऱ्यावरली उत्कट भक्ति चित्रित करून ती पतीच्या शवाबरोबर सती जाते असें त्यानें दाखवलें आहे. जवळजवळ अद्भुतरम्य वाटणारी ही गोष्ट आपल्या कुशल कलमानें रंगविण्यापेक्षां प्रस्तावनेंत ज्या दुर्दैवी स्त्रियांचा उल्लेख केला आहे, त्यांच्यापैकीं एकीची करुणकथा रंगविण्यांत साने गुरुजींनीं आपली शक्ति खर्च केली असती तर ? तर ती कथा क्वचित इतकी उदात्त ठरली नसती ! चारी बाजूंनीं कोंडमारा झालेला मध्यमवर्ग आज ज्या अनेक पळवाटा शोधीत आहे, त्यांतलीच स्वप्नाळु उदात्तता ही एक आहे. पण सर्वसामान्य माणसाच्या जीवनाच्या दृष्टीनें स्वप्नाळु उदात्तता ही मोहक विकृततेइतकीच भ्रामक आहे. गांधीवादावर राजकारणी दृष्टीनें अनेक मराठी कादंबरीकारांनीं हल्ला चढविला आहे. पण त्याचा महत्त्वाचा भाग असलेला हा मोहक उदात्तपणा सामान्य मनुष्याच्या जीवनाशीं किती विसंगत आहे आणि त्याच्या विकासाला तो कसा मारक होत आहे, हें मात्र अद्यापि कुणींच दाखविलेलें नाहीं.

फडके, माडखोलकर, अत्रे, य. गो. जोशी, साने गुरुजी वगैरे आजच्या अत्यंत लोकप्रिय लेखकांच्या ललितकथांच्या या ओझरत्या दर्शनावरून

एक गोष्ट स्पष्ट दिसून येईल. या पिढीचें लेखन अतिशय वेधक होत आहे. पण त्याच्यांत भेदकपणा मात्र नाहीं. आमच्या ललित लेखकांस चालू काळचे चित्रकार आहेत. पण भविष्याचे शिल्पकार नाहींत. कलाकाराच्या प्रतिमेवर सामाजिक जीवनाचें कलम होणें आवश्यक आहे. या बाबतींत आतां वाद उरलेला नाहीं. पण असलें कलम फार नाजुक हातानें करावें लागतें, हें अजून अनेक नामवंत लेखकांना उमगलेलें नाहीं. घसमुसळेपणानें कलम बांधल्यामुळें मूळ झाड दुखावलें गेलें, अशींच उदाहरणें फार! शिवाय जें कलम करा-वयाचें त्याचे गुणावगुण जाणण्याची पात्रताही कमी! कांहीं तरी नवीन हवें ही तळमळ अत्यंत तीव्रतेनें उत्पन्न झाली आहे. पण तें नवीन काय आहे, याची स्पष्ट कल्पना मात्र कुणाही लेखकाला नाहीं. कुणी नवमतवादाच्या निशाणाखालीं कामविकृतीचीं चित्रें रेखाटीत आहेत, कुणी पुरोगामी वाङ्मयाची पाटी लावून लाठीमारापेक्षां नायिकेच्या प्रेमकटाक्षानेंच नायक अधिक घायाळ झाल्याचें दाखवीत आहेत, तर कुणी जीवनसंग्रामांतल्या सैनिकांना संदेश म्हणून 'खा, पी आणि मजा कर' या महामंत्राचा उपदेश करीत आहेत!

यांपैकीं अनेक लेखकांना आपण बंडखोर आहों असा अभिमान वाटतो. पण व्रात्यपणा म्हणजे बंडखोरपणा नव्हे! पतंग कितीही उंच गेला म्हणून तो कांहीं विमानाची बरोबरी करूं शकत नाहीं. नवीनपणामुळें आकर्षक वाटणारा कुठलाही बदल ही क्रांति होऊं शकत नाहीं. उत्कृष्ट लेखकाची कला ही तपस्येच्या पोटीं जन्माला आलेली असते. पण ही तपश्चर्या 'ज्याच्या डोक्यावर मी हात ठेवीन तो भस्म झाला पाहिजे' असा वर मागून घेणाऱ्या भस्मासुराची नसते, तर पाताळांत दग्ध होऊन पडलेल्या पितरांचा उद्धार व्हावा म्हणून स्वर्गांतून गंगेला खालीं उतरायला लावणाऱ्या भगीरथाची असते.

आमचे आजचे लेखक अशी उज्ज्वल तपश्चर्या करीत आहेत काय? अभूतपूर्व अशा आगामी समाजक्रांतीचीं स्वप्नें पाहण्याइतकी दिव्य दृष्टि त्यांनीं प्राप्त करून घेतली आहे काय? बंडखोर मनुष्याच्या पायांत काळाच्या पुढें धांवण्याची शक्ति असावी लागते, हें त्यांनीं ओळखलें आहे काय?

या सर्व प्रश्नांचीं उत्तरें होकारार्थी आलीं असतीं तर जीवन हें एक विलासमंदिर आहे, असल्या कल्पनांशीं आमचे कलाकार खेळत बसले

नसते ! मूर्तिभंजनाची अत्यंत आवश्यकता असलेल्या या काळांत प्रीतीच्या परदेशी पुतळ्यांची पूजा करीत बसण्यांत आम्हांलाही आनंद वाटला नसता ! गांधीवाद ही नुसती आंधळी कोशिंबीर आहे अशी टीका करून कृतकृत्य होण्यांतच आमच्या बुद्धिमंतांना धन्यता वाटली नसती ! कारुण्याच्या महा-पुरांत समाज बुडून जात असतांना त्याचीं प्रतिबिंबें म्हणून शृंगार आणि हास्य यांना प्राधान्य देणारीं चित्रें काढण्यांत आमचे प्रतिभावंत रंगून गेले नसते !

शृंगार आणि हास्य या रसांचें महत्त्व मी मुळींच कमी मानीत नाहीं. व्यक्तिजीवनांत त्यांचें स्थान अलौकिक आहे. शृंगार ही जशी जीवनाची संजीवनी आहे, त्याप्रमाणें हास्य हा आयुष्यांतला कल्पवृक्ष आहे. पण व्यक्तिजीवनांत सौंदर्य आणि माधुर्य आणणारे हे दोन रस आज ज्या पद्ध-तीनें आळविले जात आहेत त्या पद्धतींत आणि दुःख विसरण्याकरितां दारूचा प्याला तोंडाला लावणाऱ्या बुद्धिमान् मनुष्याच्या वर्तनांत काय अंतर आहे ? जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत—मग तें प्रीतीचें असो, कीर्तीचें असो, कर्तृत्वाचें असो अथवा पैशाचें असो, मध्यमवर्ग पराभूत होऊन माघार घेत आहे. या पराभवाचें शल्य कुठल्यातरी उन्मादांत विसरून जावें अशी तो धडपड करीत आहे. आणि आजचे अनेक लेखक त्याची ही मागणी पुरविण्याकरितां शृंगार आणि हास्य यांचीं चित्रें, जणूं कांहीं कालिदासाच्याच काळांत आपण आहों अशा कल्पनेनें रंगवीत आहेत.

शृंगार आणि हास्य हे मुख्यतः व्यक्तिनिष्ठ रस आहेत हें मला मान्य आहे. पण मानवजातीच्या बाल्यांत त्यांचें जें स्वरूप होतें तेंच आज कायम ठेवण्याचा आमचा अट्टाहास चुकीचा नाहीं का ? विलासी वातावरणांत वाढलेल्या श्रीमंत लोकांकरितां ज्या वेळीं कवि काव्यें करीत होते, त्यावेळच्या शृंगाराचे किस्से गिरवून नव्या नव्या पुस्त्या काढण्याचें काम आमच्या लेख-कांनीं आतां बंद करायला नको काय ?

आजच्या समाजाला शृंगार हवा आहे. पण तो भूल म्हणून नको आहे, गुंगी आणणारें मद्य म्हणून नको आहे ! दमल्या भागल्या जीवाला तजें-तवानें करणारें निर्मळ पाणी म्हणून तो हवा आहे. आजच्या समाजाला



मोहांध करणाऱ्या कामकथा नको आहेत. त्याच्या उघडलेल्या डोळ्यांना जीवनाचें सत्यस्वरूप दाखविणाऱ्या प्रेमकथा हव्या आहेत ! ज्या प्रीतीमध्यें पंचमहाभूतांची शक्ति सांठविलेली असते तिचें दर्शन घेण्याला तो उत्सुक झाला आहे. प्रेम हा रोग नाहीं, तें औषध आहे— अगदीं गोड औषध आहे—या सत्याच्या प्रचीतीकडे तो आशाळभूतपणानें डोळे लावून बसला आहे. इंद्रधनुष्याप्रमाणें प्रीतीमध्यें जे विविध रंग आहेत त्यांचें चित्रण आजच्या आपल्या वाङ्मयांत विपुलतेनें होऊं लागलें, प्रणयकथेइतकेंच प्रपंचकथेलाही जर कलाकारांनीं महत्त्व दिलें, प्रीतीचा उगम शारीरिक आकर्षणांत असला तरी तिचा विस्तार मनामनांच्या मिळणीनेंच होतो, वेलीला फूल यावें त्याप्रमाणें उपभोगांतूनही भक्ति उदय पावूं शकते इत्यादि जीवनांतले खोल अनुभव जर आमच्या कलावंतांनीं आत्मीयतेनें चित्रित केले तर ते काय वाचकांना आवडणार नाहींत ?

शृंगाराइतका हास्यरस व्यक्तिनिष्ठ नाहीं. कामविषयक विकृति आणि वैयक्तिक विडंबनें यांच्याभोंवतीं पिंगा घालीत राहिल्यामुळें त्याचें सामाजिक महत्त्व ज्या कुणाला पटत नसेल त्यानें चॅप्लीनचे ' Modern Times ' आणि Great Dictator ' हे दोन चित्रपट अवश्य पहावेत. हें सामर्थ्य मराठी कथाकारांनीं पैदा केलें पाहिजे. समाजवृक्षावर वाढलेलीं सर्व बांडगुळं हंसत हंसत छाटून टाकण्याचें केवढें तरी मोठें कार्य आजच्या पिढीला करावयाचें आहे. आपल्या राजकारणापासून आपल्या वैयक्तिक जीवनापर्यंत जीं नवीं नवीं ढोंगें नित्य निर्माण होत आहेत, त्यांचा परिणामकारक पारिस्फोट करायला हास्यासारखें दुसरें हत्यार नाहीं. पण असा अभिजात हास्यरस निर्माण करण्याचें काम अजून आमचे कलावंत हातींच घेत नाहींत. शेतांत तण पेरावें लागत नाहीं, तें आपोआपच उगवतें. त्याप्रमाणें केवळ काम-विकाराला चाळविणारा शृंगार काय किंवा विडंबनबुद्धीला भुलविणारा हास्यरस काय, वाङ्मयांत विपुल प्रमाणांत उत्पन्न होत असतो. या दोन्ही रसांची उच्च, कलात्मक आणि अभिजात निर्मिति करण्याचें कामच कठिण आहे. पण तशा प्रकारची निर्मितीच वाङ्मय आणि समाज या दोघांचेंही वैभव वाढवावयाला समर्थ होईल.

शृंगार आणि हास्य यांहून अधिक व्यापक स्वरूपाचे रस तीन आहेत—

करुण, वीर व वत्सल. या तिन्ही रसांचा व्यक्तिजीवनाशीं निकटचा संबंध असला तरी सामाजिक रस या दृष्टीनें त्यांचें महत्त्व आज शतपटीनें अधिक आहे. पण हे रस आजच्या आपल्या वाङ्मयांत कितीसे आळविले जात आहेत ? सकाळीं हातांत पडणारें वर्तमानपत्र उघडून त्याच्यावर नजर टाकली तर दीनवाण्या जगाची करुणमूर्ति डोळयांपुढें उभी राहते. रानांत वणवा पेटलेला असावा, मोठमोठे वृक्ष कडाडत कोसळून पडत असावेत, आणि भयभीत झालेल्या पांखरांच्या पंखांचा फडफडाट आणि त्यांच्या चिमण्या पिलांचा चिवचिवाट तेवढा ऐकूं येत असावा ! दररोज लढायांच्या बातम्या वाचतांना हें दृश्य कुणाच्या डोळयापुढें उभें राहत नाहीं ? गोकुळांत वाढणाऱ्या कृष्णाला मारायला गेलेल्या पूतनेप्रमाणें जगांतल्या माणुसकीच्या नरडीला नख देण्याकरितां आज झोटिंगशाही थैमान घालीत आहे. कृष्णाचा वध करायला गेलेल्या पूतनेचा जसा त्याच्या हातूनच वध झाला, तसा या माणुसकीच्या हातूनच या झोटिंगशाहीला मृत्यु येईल यांत शंका नाहीं. पण अजूनही माणुसकी झोपी गेली आहे. तिला जागें करायला करुणरसाचे आर्त स्वरच हवेत. मग ते सूर आपल्या समाजांतल्या विषमतेचें वर्णन करोत, त्या विषमतेनें माणसाला माणूस म्हणून जगणें कसें अशक्य करून सोडलें आहे हें सांगोत अथवा महायुद्धाच्या ज्वाळांत ज्यांची राखरांगोळी होत आहे अशा सर्व सुंदर गोष्टींचीं विलापगीतें गावोत !

करुणरसाचा हा सामाजिक आविष्कार आपल्या आजच्या वाङ्मयांत कितीसा सांपडतो ? कांहीं भूतदयावादी लेखकांनीं रेखाटलेलीं दलितवर्गाची सरस चित्रें आणि गोरगरिबांचा कैवार घेण्याची रूढि लोकप्रिय होऊं लागल्यामुळें निघूं लागलेल्या त्या चित्रांच्या पुसट नकला, यांच्यापलीकडे मराठी प्रतिभेनें आता पुढें पाऊल टाकायला नको काय ?

मात्र हें पाऊल टाकतांना एक दक्षता घेतली पाहिजे. मध्यमवर्गाच्या निराश दृष्टिकोनांतून आमच्या लेखकांनीं जगाकडे पाहून चालणार नाहीं. त्या दृष्टिकोनांचा परिणाम निष्क्रिय, दुबळ्या आणि स्वप्नाळु चित्रणात होतो. प्रेमभंग झाल्यामुळें जीव देणारा नायक आणि बापाला हुंडा द्यायचें त्राण नाहीं म्हणून स्वतःला जाळून घेणारी नायिका हीं खोटीं माणसे नाहींत ?

पण असल्या दुबळ्या जीवांचीं चित्रें पाहून डोळ्यांत अश्रु उभे राहिले तरी त्यांत तेज चमकणार नाहीं! करुणरसाच्या सामाजिक आविष्कारानें माणुसकी नुसती जागृत करून आतां चालणार नाहीं. त्या माणुसकीला एका मोठ्या लढाईला तयार केलें पाहिजे. अज्ञानाशीं, दारिद्र्याशीं, विषमतेशीं, झोटिंगशाहीशीं, माणसाला माणूस होऊं देण्याच्या आड येणाऱ्या प्रत्येक रूढीशीं, अन्यायाशीं आणि राक्षसाशीं ही लढाई व्हायची आहे. मानवतेविषयीं मनामध्यें निःसीम वात्सल्य उत्पन्न झाल्यावांचून आणि त्या वात्सल्याची कारुण्याला जोड मिळाल्यावाचून वीररसाला सामाजिक अधिष्ठान मिळत नाहीं. आपल्या आजच्या वाङ्मयांत त्याचें जें अगदीं अंधुक आणि कृत्रिम चित्रण आढळतें त्याचीं कारणें गेल्या वीस वर्षांच्या आपल्या अश्रद्ध ध्येयहीन जीवनांत आहेत. चिपळूणकर—टिळकांनीं स्वदेशभक्तीचे जे धडे महाराष्ट्राला शिकविले, ते कानांत घुमत असल्यामुळेंच परांजपे आणि खाडिलकर यांच्या ललित कृतींतून तेजानें रसरसलेलें वाङ्मय बाहेर पडलें. राजवाडे आणि आगरकर यांनीं सामाजिक सुधारणेचें जें तत्त्वज्ञान महाराष्ट्राला सांगितलें, त्याचा रम्य आविष्कार हरिभाऊ आपटे आणि श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्या वाङ्मयांतून झाला. केळकर व वामनराव जोशी यानीं व्यवहार व तत्त्वज्ञान या भिन्न दृष्टिकोनांतून या प्रगतिपर विचारांना जसा हातभार लावला, तसा गडकरी व वरेरकर यांनीं काव्य व प्रचार या अगदी भिन्न मार्गांनीं त्यांना यथाशक्ति पुरस्कार केला.

अशा स्थितींत १९२० मध्यें भारताच्या राजकीय क्षितिजावर गांधीजींचा उदय झाला. त्यांच्या तत्त्वज्ञानांत टिळक व आगरकर यांच्या बहुतेक आकांक्षांचा समावेश झाला होता. पण त्याची मोहिनी महाराष्ट्राला पडली नाहीं, कारण या नव्या तत्त्वज्ञानाचें अधिष्ठान बुद्धि नसून अंधश्रद्धा होती! बुद्धिवाद्यानें प्रेमानें स्वागत करावें इतका गांधीवादाचा आत्मा स्वच्छ व स्पष्ट नाहीं. त्याच्यांत गूढताच अधिक आहे. एक अगदीं साधें उदाहरण पहा. बालविधवा पाहून गांधीजींचें मन अनुकंपेनें द्रवून जातें, ते पुनर्विवाहाचा पुरस्कारही करतात. पण दारिद्र्यामुळें संततिनियमनाचा पुरस्कार करणें आज आवश्यक आहे असें कुणीं म्हटलें तर तें मात्र त्यांना पटत नाहीं. अधिक संतति नको असेल तर विवाहित जोडप्यानें नैष्ठिक ब्रह्मचर्य पाळावें

असा ते हंसतमुखानें उपदेश करतात !

व्यक्ति या दृष्टीनें बुद्ध किंवा ख्रिस्त यांच्याप्रमाणें गांधी ही एक युग-प्रवर्तक विभूति आहे हें महाराष्ट्रानें आनंदानें मान्य केलें. पण प्रभावी व्यक्तित्व म्हणजे मार्गदर्शक तत्त्वज्ञान नव्हे असें त्याला मनःपूर्वक वाटत होतें. व्यक्तिजीवनाचीं सर्व उच्च मूल्यें समाजजीवनाला लावून एका बलाढ्य साम्राज्यशाहीवर विजय मिळविणें किंवा चाळीस कोटींचें एक नवें स्वतंत्र राष्ट्र निर्माण करणें शक्य नाहीं असें त्याची सद्सद्विवेकबुद्धि म्हणत होती. व्यक्तीच्या जीवनांत आत्मिक जाणिवेला थोडा फार अर्थ असला तरी सामाजिक जीवनांत ती एक अर्थशून्य गोष्ट होते. भौतिक मूल्यें हींच खरीं सामाजिक मूल्यें होत, या गोष्टीकडे गांधीजींनीं पहिल्यापासून कानाडोळा केला आहे.

याचा परिणाम व्हायचा तोच झाला. महाराष्ट्रानें गांधीजींना राजकारणांत साथ दिली ती दुभंगलेल्या मनानें—त्यांच्या तत्त्वज्ञानाचा प्रचार केला तोहि अडखळणाऱ्या जिभेनें ! महाराष्ट्राची बुद्धि गांधीजींच्या मागून निःशंक मनानें कधींच गेली नाहीं आणि महाराष्ट्राची वाणी पूर्ण आत्मीयतेनें कधीं चरकागीतही गाऊं शकली नाहीं.

या परिस्थितीचा परिणाम मराठी वाङ्मयावरही झाला. ध्येयाचें स्फूर्ति-दायक निशाण समोर नसल्यामुळें १९२० ते १९३० या दशकांत सर्व उदयोन्मुख साहित्यिक कलेच्या ध्वजाखालीं गोळा झाले. रविकिरणमंडळाचें काव्य, फडक्यांच्या कादंबऱ्या आणि आजच्या अनेक लोकप्रिय लघुकथा-लेखकांच्या आरंभींच्या कथा याच काळांत निर्माण झाल्या आहेत.

पण केवळ कलेच्या विकासानें प्रतिभेचें पूर्ण समाधान होऊं शकत नाहीं. तिला कांहीं तरी चुकल्याचुकल्यासारखें वाटूं लागतें. देहाच्या शृंगारानें मनाची भूक भागत नाहीं. महालांतल्या मंचकावर पडलेल्या विलासी राणीला खिडकींतून दूरवर दिसणाऱ्या देवळाच्या शिखराकडे पाहून हुरहूर लागावी अशी तिची स्थिति होते. वात्सल्यावांचून जशी स्त्रीच्या जीवनाला पूर्णता येत नाहीं, तसा ध्येयवादावांचून प्रतिभेलाही पुरा बहर येत नाहीं. १९३० ते १९४२ या दशकांतल्या मराठी वाङ्मयांत लेखकांच्या या मनःस्थितींचें

निश्चित प्रतिबिंब पडलें आहे. पण हें प्रतिबिंब अंधुक आहे—तें गोंधळलेल्या मनाचें द्योतक आहे !

नाहींतर १९३० च्या सत्याग्रहाच्या चळवळीच्या प्रचंड लाटांचे प्रतिध्वनि मराठी वाङ्मयांत विपुल प्रमाणांत ऐकूं आल्यावांचून राहिले असते काय? गांधीजींची दांडीयात्रा हा एका दृष्टीनें महाकाव्याला योग्य असा विषय होता. पण मेळ्याचीं पदें करणाऱ्या कवींपेक्षां अधिक उच्च दर्जाच्या महाराष्ट्रीय प्रतिभावंतांना तो स्फूर्ति देऊं शकला नाहीं. १९३२–३३ पासून आमचे लेखक या चळवळीचा उपयोग आपल्या कथा सजविण्याकडे करूं लागले. तुरुंगात जाणें अथवा लाठीमारात सापडणें इत्यादि गोष्टींनीं नायकाच्या अगर नायिकेच्या स्वभावचित्राला उठाव आणण्याची सोय झाल्यामुळें मराठींतल्याच काय, पण हिंदुस्थानातल्या बहुतेक सर्व लेखकांनीं मनातल्या मनांत सत्याग्रहसंग्रामाबद्दल गांधींचें आभार मानले असतील ! पण मराठी कथाकार या संग्रामाच्या तत्त्वज्ञानाशीं समरस कधींच झाले नाहींत. या विराट् राष्ट्रीय आंदोलनातली कल्पनारम्यता संपते न संपते तोंच राजकीय क्षेत्रांत गांधीवादावर हल्ले चढूं लागले. या हल्ल्यांचे प्रतिध्वनि मराठी कथावाङ्मयांतही भराभर ऐकूं येऊं लागले. या सर्व टीकांतून एक गोष्ट स्पष्ट दिसते—महाराष्ट्राला अजून कोणत्याही नव्या ध्येयाचें आकर्षण वाटत नाहीं. मराठी कथेला वातावरणाचा अद्यावत्पणा आणण्याचें आणि तिला थोडीफार राजकीय डूब देण्याचें कार्य गांधीवादावरल्या टीकेनें झालें असेल. पण हरिभाऊ आपटे आणि खाडिलकर यांनीं ज्या जिव्हाळ्यानें आपल्या कथा लिहिल्या तो जिव्हाळा आजकालच्या कुठल्याच कलाकृतींत दिसून येत नाहीं ! आपले बहुतेक कथाकार, बखरकार आणि टीकाकार होऊं पहात आहेत.

कथाकार जीवनाचा टीकाकार झाला तरी त्याची टीका विधायक असायला हवी—त्याला उद्यांचीं स्वप्नें रंगवितां यायला हवींत—त्याला नवी सृष्टि निर्माण करतां यायला हवी ! पण आजकालच्या आमच्या कथा निर्मितीच्या या निकषावर घासल्या तर त्यांत हीणच अधिक भरलें आहे असें आढळून येईल. नदीचें पात्र आटल्यावर पात्रांत ठिकठिकाणीं खड्डे

ह्मणून लोक जसें कष्टानें थोडें थोडें पाणी पैदा करतात, त्याप्रमाणें आम्ही कलावंत इकडून तिकडून गोळा केलेल्या या प्रसंगांनीं आपलीं कथानकें सजवीत आहों. या सजावटींत भरदारपणा नाहीं, भव्यता नाहीं, वैचित्र्य नाहीं, आणि प्रो. फडक्यांचा एकुलता एक अपवाद सोडला तर रेखीव रचनेचें कौशल्यहि नाहीं. फडक्यांचा राजाभाऊ किंवा माड-खोलकराचा सर महादेव ठाकूर याच्यासारख्या अलीकडल्या जिवंत स्वभावचित्रांची यादी करूं लागल्यास हाताच्या सर्व बोटानासुद्धा तसदी पडणार नाहीं.

असें कां व्हावें ? फडक्यांची प्रतिभा काय हरिभाऊ आपट्याच्या प्रतिभेपेक्षां कमी दर्जाची आहे ? अत्र्यांची कल्पकता काय अच्युतराव कोल्हटकरांची बरोबरी करूं शकणार नाहीं ? माडखोलकराचें वाङ्मयगुण काय शिव-रामपंत परांजप्याच्याशीं तुलना पावूं शकत नाहींत ?

आमच्यांत आज प्रतिभेची उणीव नाहीं; जीवनाच्या व्यापक जाणि-वेची उणीव आहे. कलोपासनेला लागणाऱ्या उत्कट प्रामाणिकपणाची उणीव आहे ! वाङ्मयनिर्मिति ही एक प्रकारची तपश्चर्या आहे हें आम्हांला कळतें; पण वळत मात्र नाहीं. कुठलीही तपश्चर्या पुरी झाली तर सिद्धि प्राप्त होते; पण ती मधेंच भंग पावली कीं सारे कष्ट फुकट जातात हा अनुभव आम्ही पदोपदीं विसरत आहों. लहान मुलांमध्यें कोण लवकर जेवतों अशी स्पर्धा लागावी, तशी थोर साहित्यिकांत कोण किती वेळांत लिहितो याची जणूं कांहीं शर्यतच लागली आहे. या यांत्रिक घाईच्या मुळाशीं लेखकांचें दारिद्र्यच असतें तर गोष्ट निराळी ! पण दारिद्र्या-पेक्षांही अंध आत्मविश्वास आणि कलेला आवश्यक असणाऱ्या उदात्त उन्मादाचा अभाव हे दोषच आजच्या वाङ्मयाला अधिक नडत आहेत. ‘ अर्धांगी ’ चित्रपटांतला ‘ झटपट विद्यालय ’ काढून विद्यार्थ्यांच्या एका वर्षांत सात इयत्ता पुऱ्या करणारा दामू मास्तर आम्हांला हास्यास्पद वाटतो ! पण वाङ्मयनिर्मिति करतांना आपणही दामूमास्तराचेंच अनु-करण करीत आहों याचें मात्र आम्हांला भान राहत नाहीं. कुणाच्याहि विपुल लेखनाबद्दल माझी तक्रार नाहीं. पण इमारत जेवढी उंच उठ-

वायची असेल तेवढा पायाही खोल खणावा लागतो, या गोष्टीचें आमच्या कलाकारांना स्मरण आहे कुठें ?

उत्कृष्ट वाङ्मय हा भावनाशील हृदयाचा उचंबळून आलेला उद्गार असतो ! या उद्गारांत जगांतलें दुःख आणि दैन्य पाहून असह्य वेदनेनें तळमळणाऱ्या आत्म्याचा आक्रोश हवा—जगांतलीं ढोंगें आणि सोंगें पाहून हंसणाऱ्या मनाचा खळखळाट हवा—जगातलें धैर्य आणि शौर्य पाहून उत्साहानें टाळ्या पिटणाऱ्या हृदयाचा उत्कट आनंदही हवा. हा आक्रोश, हा खळखळाट आणि हा आनंद आजच्या आमच्या ललितकथेंत कमी प्रमाणांत आढळतो याचें कारण एकच आहे—आमच्या साहित्यिकांचें संकुचित व्यक्तित्व. सबंध गांवाला पाणी पुरविण्याकरितां गांवाजवळच उंचावर जसा पाण्याचा खजिना बांधावा लागतो त्याप्रमाणें सर्व समाजाला आपल्या सजीवतेनें हलवून सोडणाऱ्या ललितकथेच्या निर्मात्यांनीं आपल्या मनाची उंची आणि अनुभवांचा सांठा हीं नेहमीं वाढत राहतील अशी दक्षतेनें काळजी घेतली पाहिजे. या बाबतींत आजचा एकही कथाकार हरिभाऊंची बरोबरी करूं शकत नाहीं. विकासशील व्यक्तित्वाशिवाय ललितलेखक द्रष्टा होऊं शकत नाहीं. पण या महत्त्वाच्या गोष्टीकडे दुर्लक्ष झाल्यामुळें आजच्या सुंदर ललितकथांत समाजाच्या विशाल आणि सखोल चित्रणापेक्षां आत्मचरित्र व कल्पनारम्यता यांचेंच विलक्षण मिश्रण झालेलें आढळतें. जमीन भाजून काढली कीं तिच्यांत ज्याप्रमाणें चांगलें पीक येतें, त्याप्रमाणें लेखकाचें व्यक्तित्व जगांतल्या विविध अनुभवांशीं समरस होऊन घोळून आणि पोळून निघालें म्हणजे सामान्य मनुष्याला न दिसणाऱ्या गोष्टी त्याला दिसूं लागतात —उज्ज्वल भाविष्याचीं भव्य चित्रें त्याच्या डोळ्यांपुढें नाचूं लागतात.

हा भव्यपणाचा गुण आमच्या आजच्या ललितकथेंत तर नाहींच. पण १९२०–१९३० या कालखंडांत तिनें संपादन केलेलें कलासौंदर्यही ती टिकवूं शकेल किंवा काय याविषयीं रसिकांच्या मनांत शंका उत्पन्न होऊं लागली आहे. केवळ कलाविलासानें कुठल्याही साहित्यिकाला आत्मप्रकटनाचा अनिर्वचनीय आनंद मिळत नाहीं हें खरें असलें तरी कला आणि प्रचार यांचें जबरदस्तीनें लग्न लावून त्या दोघांच्या दररोजच्या भांडणांनीं

कान किटवून घेण्यापेक्षां लेखकानें आपल्या कलेला कुमारिका ठेवणें अधिक बरें हा कटु अनुभव सध्यांच्या अनेक नीरस ललितकथा देत आहेत. शाल-जोडी आणि घोंगडी हीं दोन्ही आपापल्यापरी सुंदर आणि उपयुक्त अशीं वस्त्रें आहेत, पण ह्या दोन्हींचा निम्मानिम्मा भाग घेऊन त्यांची गोधडी शिवली तर ती नुसती विशोभितच दिसणार नाहीं, तर ती निरुपयोगीहि होईल. आजची सर्वसामान्य मराठी ललितकथा अशीच घेडगुजरी झाली आहे. ती परिणामकारक प्रचारही करूं शकत नाहीं आणि कलेचा रम्य आविष्कारही करूं शकत नाहीं. कलेचा उगम संघर्षाइतकाच संगमांत आणि संग्रामांत आहे या गोष्टीकडे दुर्लक्ष झाल्यामुळें कित्येकांच्याकडून कथनकलेची इतकी विलक्षण विटंबना होत आहे कीं तिला पाहून दुःशासनानें दरबारांत ओढीत आणलेल्या द्रौपदीलासुद्धां आपली स्थिति बरी असें वाटावें.

आजच्या ललितकथेचे हे मोठे दोष दूर झाले तरीही आमचे ललित लेखक जोंपर्यंत ध्येयशून्य राहतील, आकाशांत डौलानें फडफडणारें सर्वस्पर्शी सामाजिक क्रांतीचें निशाण उभारून त्याच्याभोंवतीं गोळा होण्याऐवजीं आपापलीं चिमुकलीं आणि चित्रविचित्र निशाणें घेऊन त्याच्यासाठीं लुटुपुटीची लढाई करण्यांतच जोंपर्यंत त्यांना समाधान वाटत राहील, सामान्य माणसाचें आयुष्य हा आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ आहे असें समजून जोंपर्यंत ते बुद्धिप्रधान बडबड करणारीं बाहुलीं किंवा विकृतीनें रंजविणारीं विलक्षण चित्रें रंगवीत राहतील, तोंपर्यंत आमच्या ललितकथेचें अधिक कलात्मक आणि अधिक परिणामकारक स्वरूप दृष्टीला पडणें अशक्य आहे. स्वतःला बंडखोर म्हणविणाऱ्या सर्व मराठी ललितलेखकांच्या अंतःकरणांत डोकावून पाहावें. प्रत्येकजण अगदीं सामान्य सुधारक आहे असें आढळून येईल. जीवनाच्या वणव्याची वाढती आग पाहून काल्पनिक प्रेममंदिरांत पळून जाणारे, या आगीचे चटके विसरण्याकरितां उत्तान विनोदाच्या कारंजाखालीं जाऊन बसणारे, भ्रामक तत्त्वज्ञानाचा पडदा डोळ्यांपुढें धरून या आगी-पासून आपलें रक्षण होईल असें मानणारे आणि भूतदयेच्या तुषारांनीं हा वणवा विझेल अशी आशा बाळगून धडपडणारे असे अनेक प्रकार या दुबळ्या सुधारकांत दिसून येतील. पण त्यांच्यांपैकीं कुणाचेंही वाङ्मय आजच्या काळाच्या अपेक्षा पुऱ्या करूं शकणार नाहीं. सामाजिक क्रांति जवळ आण-

णारें वाङ्मय या लेखकाच्या हातून निर्माण होणार नाहीं असें नाहीं. पण त्या आधीं एक क्रांति होणें आवश्यक आहे. ती क्रांति आम्हां लेखकांच्या हृदयांतच व्हायची आहे ! व्यक्तिजीवनाचें सौंदर्य आणि स्वातंत्र्य लुप्त करणाऱ्या सर्व गोष्टींची आम्हांला चीड येते. पण एक गोष्ट आम्ही नेहमीं विसरून जातों. व्यक्तिजीवनाचे सौंदर्य आतां व्यक्तीवर अवलंबून नाहीं, तें समाजावर अवलंबून आहे—समाजजीवनाच्या सौंदर्यावर आणि स्वातंत्र्यावर अवलंबून आहे. समाजजीवनांत सौंदर्य, सामर्थ्य आणि साधुत्व यांचा संगम साधणें हेंच आता आपलें तत्त्वज्ञान आहे. लुळ्यापांगळ्या झालेल्या मध्यम वर्गाचे अश्रु दाखवून आणि उसासे ऐकवून किंवा त्याला दुःखाचा विसर पडावा म्हणून अश्वहास्य आणि असत्य तत्त्वज्ञान यांचा आश्रय करून मराठी ललितकथा यापुढें प्रगति करूं शकणार नाहीं. उद्यांचा सुंदर महाराष्ट्र निर्माण करणाऱ्या दिव्य शक्तींत तिला स्थान मिळणार नाहीं !

ज्ञानदेवानें बहुजनसमाजाकरितां गीता मराठींत आणली, तुकारामानें बहुजनसमाजाकरितां वरिष्ठ वर्गाच्या दंभावर कोरडे ओढले, बहुजनसमाजासाठीं टिळकांनीं सरकारच्या रागालोभाची काडीभरही कदर केली नाहीं, आणि बहुजनसमाजासाठींच आगरकरांनीं स्वतःची प्रेतयात्रा डोळे भरून हंसतमुखानें पाहिली. मराठी वाणीची परंपरा इतकी पवित्र, प्रगतिपर आणि प्रभावशाली आहे. आज भोंवतालीं काळोख पसरला असला तरी तो पहाटेपूर्वीचा आहे, हें ओळखण्याचें चातुर्य तिच्या अंगात आहे. या काळोखाला उजळून टाकणाऱ्या अरुणोदयाचीं गीतें गाणें हेंच आतां तिचें कार्य आहे.

अरुणोदय—नवें युग—नवें जग—कोणतेंही नाव दिलें तरी यापुढें एकच तत्त्वज्ञान आतां मराठी लेखकांना स्फूर्ति देऊं शकेल. या नव्या तत्त्वज्ञानांत स्वप्नाळूपणाला जागा नाहीं आणि विषमतेला थारा नाहीं; या नव्या तत्त्वज्ञानाच्या प्रभावानें जें जग निर्माण होईल त्यांत एकच जात राहील—ती म्हणजे माणूस ! या नव्या जगांत एकाच धर्माचा जयजयकार होईल—तो धर्म म्हणजे माणुसकी ! या जगांतल्या मंदिरांत एकाच देवतेची पूजा होईल—ती देवता म्हणजे समता— जीवनाचा विकास करण्याची समान

संधि. या जगांत प्रीतीला कोणतींही कृत्रिम बंधनें आडवणार नाहींत. पण त्याचबरोबर कामतृप्ति हेंच मानवी जीवनाचें सर्वस्व मानून तिच्यामागें माणसें वेड्यासारखीं धांवत सुटणार नाहींत. या जगांत अनेक लढाया होतील. पण त्या माणसामाणसामध्यें होणार नाहींत! त्या मनुष्य आणि निसर्ग, मनुष्य आणि अज्ञान, मनुष्य आणि दारिद्र्य यांच्यामध्यें होतील! या लढाया कदाचित् अनेक पिढ्यांना लढाव्या लागतील. पण त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें काय आहे? पृथ्वीतलावर मनुष्य निर्माण झाल्यापासून तो असल्याच लढाया लढत आला आहे. पशूप्रमाणें जगणाऱ्या रानटी जीवापासून आजच्या सुसंस्कृत मानवापर्यंत मानवजातीचा जो विकास झाला, तो असल्या अनेक लढायांत मिळविलेल्या विजयांमुळेंच. या विजयांचें श्रेय बुद्ध—खिस्ता-सारख्या धर्मसंस्थापकांना आहे, लुई पाश्चर व एडिसन यांच्यासारख्या संशो-धकांना आहे, मार्क्स व फ्राइड याच्यासारख्या शास्त्रज्ञांना आहे आणि इब्सेन-टॉलस्टॉयसारख्या साहित्यिकानाही आहे. आज मानवजातीचे विजय अपुरे पडत आहेत. तिला नवे शत्रू उत्पन्न झाले आहेत. पण या नव्या शत्रूंचा निःपात करून ती भविष्यकाळांत सुखी होईल याविषयीं मला मुळींच शंका वाटत नाहीं. मानवतेचें हें जें नवें मंदिर आंखलें जात आहे त्याला रानडे, टिळक, आगरकर, रवीन्द्र, गांधी, हरिभाऊ आपटे, जवाहरलाल, सावरकर, रॉय वगैरे अनेक भारतमातेच्या सुपुत्रांनीं हातभार लावला आहे. तें मंदिर लवकर उभारलें जावें म्हणून महाराष्ट्रानें पुढें सरसावलें पाहिजे. महाराष्ट्राचे विचार आणि भावना ज्यांनीं अंकित केल्या आहेत त्या साहित्यिकांनीं या बाबतींत पुढाकार घेतला पाहिजे.

वर्तमानकाल आणि भविष्यकाल याच्या क्षितिजावर तरळणारें हें नव्या जगाचें चित्र पाहतांना या चित्रांत आपले जीवनरंग भरण्याकरितां मराठी ललितकथेनें आपला आजचा दुबळेपणा आणि उथळपणा दूर फेंकून द्यावा असें सुचवितांना मी एखाद्या स्वप्नांत आहे असें अनेकांना वाटेल.

पण मी स्वप्नांत नाहीं. युरोपांत वाहणारा निष्पाप मानवी रक्ताचा पूर मला दिसत आहे. हुकूमशाहीच्या राक्षसी टांचाखालीं चिरडल्या जाणाऱ्या मानवी संस्कृतीचें आक्रंदन मला ऐकूं येत आहे. पण कंसाला ठार मार-णारा कृष्ण जसा त्याच्या कारागृहांतच जन्माला आला, त्याप्रमाणें या

अघोर हुकूमशाहीचा नाश करणारें नवें युग मानवतेच्या या छळांतूनच निर्माण होईल अशी मला खात्री वाटते. हें नवें युग निर्माण करण्याच्या कामांत मराठी लेखकांनीं आघाडीवर असलें पाहिजे—आपला मराठी बाणा पुन्हां प्रगट केला पाहिजे एवढेंच माझें म्हणणें आहे आणि म्हणूनच शुद्ध-लेखनाच्या एकरूपतेपासून महाराष्ट्राच्या एकीकरणापर्यंतचे अनेक व्यावहारिक प्रश्न महत्त्वाचे आहेत याची जाणीव असून, लेखकाच्या दारिद्र्यापासून शास्त्रीय वाङ्मयाच्या दारिद्र्यापर्यंतच्या सर्व प्रश्नांची चर्चा निकडीची आहे हें कळत असून, गेल्या वीस वर्षांत वासंतिक वैभवानें नटलेल्या मराठी वाङ्मयाच्या सौंदर्यापासून लवकरच स्थापन होऊन येत्या वीस वर्षांत साऱ्या महाराष्ट्रावर आपली छाया पसरणाऱ्या महाराष्ट्र विद्यापीठाच्या सामर्थ्यापर्यंत अनेक महत्त्वाचे विषय समोर उभे असून, मी आजच्या ललितवाङ्मयांतील विशेषतः ललितकथेंतील वैगुण्यांची चर्चा केली. पाश्चात्य राष्ट्रांप्रमाणें आपल्याकडेही ललित वाङ्मय हाच सामान्य मनुष्याचा धर्म होऊं पहात आहे. ललितकथा सामान्य मनुष्याच्या आयुष्यांत तत्त्वज्ञानाच्या ग्रंथाची जागा घेत आहे. आजचा ललितलेखक हा नुसता भूतकालाचा इतिहासकार किंवा वर्तमानकालाचा चित्रकार नाहीं; तो भविष्यकालाचा शिल्पकार आहे. रशियांतली क्रांति टॉलस्टॉयनें शंभर वर्षें अलीकडे आणली असें लेनिन म्हणत असे. आपल्यांत आज टॉलस्टॉयच्या योग्यतेचा लेखक नाहीं हें खरें. पण अनेक ओढे मिळूनच नदी होत असते. वामनराव जोशी, वरेरकर, चिं. वि. जोशी, फडके, माडखोलकर, अत्रे, यशवंत, गिरीश, देशपांडे, काणेकर, य. गो. जोशी, कृष्णाबाई, लक्ष्मणराव सरदेसाई प्रभृति आजचे प्रौढ पिढींतले लेखक आणि नव्या नव्या संस्कारांच्या बाबतींत त्यांच्यापेक्षांही अधिक भाग्यवान् असलेले कुमार रघुवीर, बेडेकर, चोरघडे, शेष, बोरकर, निरंतर, आंबेकर, तळवलकर, कुसुमाग्रज प्रभृति अनेक नामवंत लेखक एका निशाणाभोंवतीं गोळा झाले तर त्यांचें वाङ्मयकर्तृत्व काय टॉलस्टॉयपेक्षां कमी भरेल ? मराठी साहित्यिकांच्या या नव्या निशाणावर तीनच छोटीं वाक्यें अखंड चमकत राहतील—"मनुष्य हा परिस्थितीचा गुलाम नाहीं. तो आपल्या मनाचा गुलाम आहे. मनाच्या शृंखला वाङ्मयच तोडूं शकतें.'

---

## मित्रहो,

या संमेलनाचें अध्यक्षस्थान मी स्वीकारावें असें सुचविण्याकरतां आपले चिटणीस माझ्याकडे आले त्यावेळीं क्षणभर मी गोंधळून गेलों. एका क्षणांत धरणीकंपाचे दोन धक्केच बसले म्हणनात माझ्या मनाला! ते दोन्ही धक्के फार छोटे होते खरे! पण धक्का कितीहि लहान असला तरी तो धक्काच असतो! आणि त्यांतहि धरणीकंपाचा धक्का म्हणजे रस्त्यानें जाणाऱ्या हत्तीनें मोठ्या नाजुकपणानें एखाद्याच्या अंगावरून आपली सोंड फिरविली म्हणून काय तो मनुष्य घाबरल्याशिवाय राहील?

आनंदाची गोष्ट एवढीच कीं माझ्या मनाला बसलेले हे धक्के भीतीचे नसून आश्चर्याचे होते. सांगली किंवा कोल्हापूर यांच्या मानानें मिरज फार लहान गांव आहे. असें असून दक्षिणी संस्थानांतल्या पत्रकारांचें संमेलन भरविण्याचा उपक्रम या चिमुकल्या शहरानें कां करावा असा प्रश्न साहजिकच माझ्यापुढें उभा राहिला. मिरजेंत पाण्याचा सदैव दुष्काळ असतो असें आपण वर्षानुवर्षें ऐकत आलों आहों. मिरजेंत दुसरा धंदाही नसला तरी पाणक्याचा धंदा उत्तम चालतो असें माझे एक विनोदी मित्र नेहमींच म्हणत असतात. तेव्हां या बाबतींत दक्षिण महाराष्ट्रांतल्या सर्व पत्र-

कारांनीं मिळून जोराची चळवळ करावी म्हणून तर हा संमेलनाचा बेत मिरजेच्या मंडळींनीं मोठ्या मुत्सद्दीपणानें जुळवून आणला नसेल ना अशी शंका माझ्या मनाला सहजच चाटून गेली. वाटलें पत्रकार हा जरी साऱ्या जगाचा जवळचा नातलग असला तरी परदुःख शीतळ या म्हणीला तो सुद्धां अपवाद होऊं शकत नाहीं. तेव्हां संमेलनासारख्या सोज्ज्वळ निमित्तानें आजूबाजूच्या पांचपन्नास पत्रकारांनीं मिरजेंत यावें—एक दिवस कां होईना दोन तांब्ये पाण्यांत कराव्या लागणाऱ्या काकस्नानाचें वैभव त्यांना दाखवावें आणि गाड्यावरून कष्टानें आणलेल्या चार घागरींचें सुख कसें असतें हें त्यांच्या अनुभवाला आणून द्यावें, म्हणजे ते मुकाट्यानें पिढ्यानु-पिढ्या चालत आलेलें हें गाऱ्हाणें दूर करण्याकरतां आपापल्या लेखण्या सरसावतील अशी कल्पना कुणाच्या तरी कल्पक डोक्यांत येऊन तिची परिणति या संमेलनांत झाली असावी !

मात्र हा विचार माझ्या मनांत ज्या वेगानें आला, त्याच वेगानें तो तिथून पळाला. त्याच क्षणीं दक्षिण महाराष्ट्र साहित्य संमेलनाचा पुरस्कार प्रथम मिरजेनेंच किती हिरीरीनें केला आणि तें संमेलन किती यशस्वीपणानें पार पाडलें याची मला आठवण झाली. मिरजेंत पाण्याचा दुष्काळ असला तरी मिरजेंतल्या नागरिकांच्या अंगांत तें भरपूर आहे आणि इथल्या हवे-मुळें नुसत्या रोग्यांच्याच नाहीं तर कार्यकर्त्यांच्या अंगींहि उत्साह संचारत असला पाहिजे हें त्या संमेलनानें सिद्ध करून दाखविलें होतें. त्यामुळें डॉ. वानलेस यांचें कार्यक्षेत्र होण्याच्या भाग्याप्रमाणें सार्वजनिक कार्याच्या हौसेचें देणेंहि मिरजेला देवदयेनें लाभलें आहे हें मला स्वतःशीं कबूल करावेंच लागलें !

या विचारानें मला पहिल्या धक्क्यांतून सावध केलें. पण दुसरा धक्का मला पहिल्यापेक्षांहि जरा अधिक जाणवला ! तो धक्का म्हणजे अध्यक्षस्थानीं झालेली माझी योजना ! माझ्या मनांत आलें—एखाद्या गोष्टीचा निर्णय करणें कठिण झालें म्हणजे जुनीं माणसें देवापुढें चिठ्या टाकून लहान मुलाकडून त्यांच्यांतली एक उचलवून तो निकाल मान्य करीत असत ना ? बहुधा त्याच पद्धतीनें माझें नांव या पत्रकार संमेलनाच्या अध्यक्षपदाकरतां

सुचविलें गेलें असावें. कदाचित् मिरजेंत एक पत्रकारांचें नि दुसरें साहित्यिकांचें अशीं दोन संमेलनें एकाच वेळीं भरणार असतील आणि अध्यक्षांना निमंत्रण करायला जातांना चुकून चिटणिसांची अदलाबदल झाली असेल. सुवर्णकंकणें हातांत सुंदर दिसतात; पण कर्णभूषणें म्हणून कुणी त्यांचा उपयोग करूं लागला तर तें हास्यास्पद होणार नाहीं का ? ' साहित्यिक ' असा ज्याच्यावर गेलीं वीस वर्षें अखंड शिक्काछाप बसत आला आहे अशा माझ्यासारख्या मनुष्यानें पत्रकारसंमेलनाचा अध्यक्ष होणें ही गोष्टही तितकीच शहाणपणाची ठरण्याचा संभव आहे.

या शंकेच्या पाठोपाठ गेल्या पांच सहा वर्षांत पत्रकार आणि साहित्यिक यांच्यामध्यें जणुं कांहीं वर्गयुद्ध सुरू झालें आहे अशा अभिनिवेशानें अनेक विद्वानांनीं तावातावानें काढलेले उद्गार मला आठवले. दोन वर्षांपूर्वी एका प्रसिद्ध पंडितांनीं पॅरिसमध्यें पारंगततेचें प्रमाणपत्र असल्याशिवाय केशकर्तनसुद्धां करूं दिलें जात नाहीं, पण आपल्याकडे मात्र हवा तो अर्धाकच्चा मनुष्य वृत्तपत्रांतून आपल्या अकलेचे तारे तोडूं लागला तरी तो त्या कामाला अपात्र मानण्यांत येत नाहीं, अशी कांहीं कारणानें तीव्र टीका केली. या टीकेची प्रतिक्रिया म्हणून मराठी पत्रकारपरिषदेच्या पुढल्या अधिवेशनाच्या अध्यक्षांनीं—कदाचित् आपल्या वक्तृत्वाला अभिनयाची जोड देण्याकरतां असेल—पत्रकारांचा असा अपमान करणाऱ्या साहित्यिकांना आम्ही ठोकरीनें उडवून देऊं अशी वीरगर्जना केली. शब्दसृष्टीच्या या दोन ईश्वरांमधली ही लठ्ठालठ्ठी पाहून या दोन वर्गांबाहेरच्या सर्व लोकांची खूप करमणूक झाली यांत मुळींच संशय नाहीं. पण साहित्यिक आणि पत्रकार यांच्यांत खरोखरीच फार मोठा भेद आहे, त्यांतला कुणीतरी एक स्वर्गांत निवास करीत असून दुसरा पाताळांत राहतो, अशी सोईस्कर समजूत करून घेऊन एकमेकांवर आग पाखडणाऱ्या या अनेक विद्वानांना एक प्रश्न विचारण्याची इच्छा त्यावेळीं माझ्या मनांत अत्यंत प्रबळ झाली होती. पत्रकार व साहित्यिक या दोघांनाहि मी हात जोडून म्हणणार होतों, ' वीर पुरुषहो, आपण दोघेहि मोठे पराक्रमी भाऊभाऊ आहांत अशी आम्हां सामान्य लोकांची समजूत आहे. आतां भावाभावांनाहि मधून मधून लठ्ठालठ्ठी करण्याची लहर येते हें खरें ! तुमची सुंदोपसुंदी ही तसलीच

एक लहर असेल तर आम्हीं पामरांनीं तुम्हां प्रतिभासंपन्न पंडितांना उपदेश करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. पण कृपा करून एक गोष्ट विसरूं नका. सुंद आणि उपसुंद एकमेकाशीं लढले ते तिलोत्तमेकरतां. तुमची गुद्दागुद्दी आम्हांला स्पष्ट दिसत आहे; पण ज्या तिलोत्तमेसाठीं हें सर्व चाललें आहे तिच्या नखाचासुद्धां अजून कुठें पत्ता नाहीं. तेव्हां कृपा करा आणि हें सुंदोपसुंदाचें आख्यान बंद करून रामलक्ष्मणाची कथा आम्हांला ऐकवा.

मित्रहो, साहित्यिक आणि पत्रकार यांच्यामध्यें निष्कारण भेदभाव करण्याची जी प्रवृत्ति मध्यंतरीं आपल्यांत बळावूं पाहात होती तिची निरर्थकता कृतीनें सिद्ध करण्याकरतांच तुम्हीं या संमेलनाच्या अध्यक्षस्थानीं माझी योजना केली आहे असें मी मानतों. मराठी साहित्याइतकेंच महाराष्ट्रांतल्या वृत्तपत्रांवरहि माझें प्रेम आहे. केशवसुत, हरिभाऊ आपटे, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर आणि गडकरी या साहित्यिकाइतकेच टिळक, आगरकर, शिवरामपंत परांजपे आणि केळकर हे पत्रकार मला प्रिय वाटतात. कुसुमाग्रज किंवा बोरकर यांच्या कविता जेवढ्या आवडीनें मी वाचतों तेवढ्याच आवडीनें पांडुरंगराव गाडगीळांचे अलीकडचे अग्रलेखही मी पाहतों. महाग मिळणारी वस्तु अधिक चांगली असते या भोळ्या कल्पनेनें दररोज किंवा आठवड्याला वाचायला मिळणाऱ्या लिखाणापेक्षां महिन्यानें किंवा वर्षानें वाचायला मिळणारें लिखाण फार श्रेष्ठ असलें पाहिजे या गोष्टीवर श्रद्धा ठेवणारे लोक आतां फार थोडे निघतील असें मला वाटतें !

वृत्तपत्र हें उद्यान नसून तें रणमैदान आहे हें कुणीच नाकबूल करीत नाहीं ! इथें पावलोपावलीं ललित शब्दांचे लताकुंज आपलें स्वागत करणार नाहींत, कल्पनाविलासाचीं कारंजीं चिमुकलीं इंद्रधनुष्यें निर्माण करीत आपल्या डोळ्यांना सुखाविणार नाहींत, सुभाषितांचीं रंगीबेरंगी पुष्पें या भागांत विपुलतेनें फुललेलीं दिसणार नाहींत आणि मृदु अथवा मधुर भावनांचें कोकिलकूजनहि या जागीं वारंवार आपल्या कानांवर पडणार नाहीं हें प्रत्येक वाचक जाणतो. पण हें सारें गृहीत धरूनहि मराठी वृत्तपत्रें हे आमचे उत्कृष्ट साहित्यनिर्मितीचे अखंड झरे आहेत असें विधान करतांना मी अतिशयोक्ति करीत आहें असें मला मुळींच वाटत नाहीं. मराठींतलें

बरेंचसें अमर निबंधवाङ्मय वृत्तपत्रांनींच निर्माण केलें आहे. आगरकरांचा ‘ सुधारक ’, टिळकांचा ‘ केसरी ’, शिवरामपंतांचा ‘ काळ ’ आणि अच्युतरावांचा ‘ संदेश ’ या लोकमताचें लोखंड वितळवून त्याला इष्ट आकार देणाऱ्या प्रचंड भट्ट्याच होत्या. या भट्ट्यांतल्या गगनचुंबी अग्नि-ज्वाळांचीं उष्णता जितकी प्रखर होती तितकेंच त्यांचें स्वैर नर्तनहि मनोहर होतें. या ज्वाळा नसून वायुलहरींबरोबर फुगड्या खेळणाऱ्या उंचउंच वेली आहेत आणि या ज्वाळांतून बाहेर पडणारे स्फुल्लिंग हीं त्या वेलींचीं फुलें आहेत, असाच त्या प्रतिभांचें अग्निनृत्य पाहतांना आपल्याला अजूनहि भास होत नाहीं काय ? ही गोष्ट उघड उघड दिसत असताना पत्रकारांची जात निराळी आणि साहित्यिकांची जात निराळी या तर्कदुष्ट विचार-सरणीचा पाठपुरावा करण्यांत काय अर्थ आहे ?

आजचा काळ जुन्या जाती मोडण्याचा आहे; नव्या निर्माण करण्याचा नाही. जुन्या भिंती पाडण्याचा आहे; नव्या उभारण्याचा नाहीं. कुणा साहित्यिकानें टीकेच्या अभिनिवेशांत पत्रकारांच्या धंद्याविषयींचें एखादें कटु सत्य किंचित् लागट भाषेंत सांगितलें किंवा एखाद्या पत्रकारानें हेव्या-दाव्याला बळी पडून कुणा साहित्यिकावर आग पाखडली तर त्या प्रकर-णाचा समाचार, संभावना अथवा सूड हीं वैयक्तिक मानलीं जावींत. त्यांना कुठल्याहि एका वर्गाचें प्रातिनिधिक स्वरूप देण्याची चूक आपण करता कामा नये. ‘ एकच प्याल्यां ’तले डॉक्टर आणि वैद्य रोग्याचा प्राण वांचविण्याकडे लक्ष न देतां एकमेकाचा जीव घ्यायला उठतात ! एवढ्या-वरून पाश्चात्य वैद्यक आणि आयुर्वेद हीं परस्परविरोधी वैद्यकशास्त्रें आहेत असें सिद्ध करण्याचा कुणी प्रयत्न केला तर आपण त्या शहाण्याला कोणत्या कोर्टींत घालूं ?

पत्रकार आणि साहित्यिक यांच्या प्रतिभेचा आविष्कार भिन्न रूपांनीं होत असला तरी मूलतः ती एकच आहे. दोघेहि सरस्वतीचेच निष्ठावंत उपासक आहेत. टीचभर लेखणी हेंच दोघांचेंहि शस्त्र आहे. या छोट्य शस्त्रानें जग अधिक सुंदर, अधिक सामर्थ्यशाली, अधिक सुसंस्कारयुक्त, अधिक सत्प्रवृत्त आणि अधिक सुखी करतां येईल अशी श्रद्धा पत्रकार

व साहित्यिक या दोघांच्याहि अंतःकरणांत संचार करीत असते. या श्रद्धेमुळेंच वर्षाकांठीं वर्तमानपत्रांतून अवघी तीस रुपये मिळकत झाली असूनहि दम्यानें गांजलेले आगरकर ' टांकातून अर्थबोधक अक्षरें लिहिण्याचें सामर्थ्य असेपर्यंत इष्ट असेल तेंच बोलणार ' अशी गर्जना करतात. या निष्ठेनें प्रेरित झाल्यामुळेंच कादंबरीलेखन फारसें फलदायक होत नाहीं असा कटु अनुभव असूनहि कर्जाच्या टोंचणीनें बेजार झालेले हरिभाऊ आपटे जीवनाच्या सायंकाळीं ' कर्मयोग ' सारखी सुंदर कादंबरी लिहूं लागतात. या श्रद्धेची संजीवनी लाभली होती म्हणूनच तरल प्रतिभा आणि चंचल दैव यांच्या प्रीतीला सारखेच पात्र झालेले अच्युतराव कोल्हटकर लोकप्रियतेचे विलक्षण चढउतार एखाद्या स्थितप्रज्ञाप्रमाणें पाहूं शकतात. ही श्रद्धा ज्याच्या अंगीं पुरेपूर बाणलेली असते, आपल्या शब्दाशब्दांतून फुलें फुलत आहेत किंवा घणाचे घाव घातले जात आहेत असा साक्षात्कार ज्याला होत असतो, तोच दारिद्र्याची पर्वा न करतां आणि कीर्तीची चाड न धरतां यशस्वी साहित्यिक किंवा पत्रकार होऊं शकतो.

मात्र पत्रकार आणि साहित्यिक यांच्या आत्मशक्तीचा उगम एकच असला तरी तिचा आविष्कार करण्याच्या त्यांच्या पद्धतींत प्रकृति आणि परिस्थिति यांच्या भिन्नत्वामुळें अतिशय अंतर पडतें. साहित्यांत सरस्वती बहुधा महालक्ष्मीचें रूप धारण करून अवतरते. पण वृत्तपत्रांतला तिचा अवतार महाकालीला शोभण्यासारखा असतो—नव्हे, तसा तो असावाच लागतो. दुष्टांचें दंडन आणि अन्यायांचें परिमार्जन हेंच तिचें त्या क्षेत्रांतलें मुख्य कार्य होऊन बसतें. या कार्याला अनुरूप अशी प्रकृति, प्रतिभा, आणि परिस्थिति ज्या साहित्यिकांना लाभलेली असते ते प्रभावी पत्रकार होतात. इंग्रज सरकारनें अगदीं स्वराज्याचें बक्षीस लावलें असतें तरी लोकमान्य टिळकांनीं सामाजिक कादंबरी लिहायला घेतली असती असें मला वाटत नाहीं. आणि 'करमणुकी' सारखें सुंदर साप्ताहिक वर्षानुवर्षें चालविणाऱ्या हरिभाऊ आपट्यांचा मराठी पत्रकारांच्या इतिहासांत गौरवानें उल्लेख करणें अगत्य असलें, तरी त्यांचा प्रकृतिधर्म साहित्यिकाचा होता असाच निर्णय पुढील पिढी देईल.

पत्रकारांत स्वभावतःच एक प्रकारचा लढाऊपणा—निदान बेडरपणा—

असावा लागतो. हरतऱ्हेच्या दैनंदिन सामाजिक सुखदुःखांशीं समरस होण्या-इतका लवचिकपणा अंगीं असणें हाही पत्रकाराचा एक मुख्य गुण आहे. कुठलें तरी विशाल ध्येय डोळयांपुढें लखलखत असलें, कोणत्यातरी विचार-प्रणालीचा उत्कट अभिमान मनांत सळसळत असला, आपल्याला समा-जाला कांहीं सांगायचें आहे, शिकवायचें आहे, त्याला विलंब न लावतां सुधारायचें आहे, त्याचा दुबळेपणा नाहींसा करायचा आहे, अशा प्रकारची उत्कट पोटतिडीक मनाला अस्वस्थ करून सोडीत असली, म्हणजेच आदर्श पत्रकार निर्माण होतो. प्रत्येक चांगल्या साहित्यिकाला हें जमेलच असें नाहीं. अत्रे आणि फडके हे दोघेहि ललित वाङ्मयांत कीर्ति मिळवून नंतर वृत्तपत्राच्या आखाड्यांत उतरले. पण अत्र्यांच्या अंगीं अच्युतराव कोल्हटकरांचे अनेक गुणावगुण उपजतच असल्यामुळें ते ज्या तडफेनें ' नवयुग ' गाजवूं शकले, तिचा आढळ फडक्यांच्या 'झंकारां'त कधींच झाला नाहीं.

हा भेद दिग्दर्शित करण्यांत अत्रे किंवा फडके यांचें पत्रकार या नात्यानें संपूर्ण मूल्यमापन करण्याचा किंवा साहित्यिक आणि पत्रकार यांच्यांत कोण श्रेष्ठ आहे हा निष्फळ वाद वाढविण्याचा माझा हेतु नाहीं. पत्रकार आणि साहित्यिक यांची जात एकच असली तरी प्रत्येक प्रभावी पत्रकार यशस्वी साहित्यिक होणार नाहीं किंवा प्रत्येक प्रतिभासंपन्न साहित्यिक श्रेष्ठ पत्रकार म्हणून आपलें वैशिष्टय दाखवूं शकणार नाहीं एवढेंच मला सुचवायचें आहे. माडखोलकर व पु. य. देशपांडे यांनीं ललितवाङ्मयाप्रमाणें वृत्तपत्र-सृष्टींतहि आपलें व्यक्तित्व थोड्याफार यशस्वी रीतीनें प्रगट केलें आहे. असले सव्यसाची लेखक आज महाराष्ट्रांत विरळ असले तरी त्यांची संख्या यापुढें निश्चितपणें वाढत राहील आणि साहित्यिक व पत्रकार यांनीं एक-मेकाकडे पाठ करून बसण्यांत समाजाचें कल्याण नसून त्यांनीं मानव-धर्माच्या ध्वजाखालीं खांद्याला खांदा लावून लढण्यानेंच त्याची प्रगति होईल ही गोष्ट प्रत्येकाला पटेल अशी माझी खात्री आहे. कालप्रवाहच या दोन शक्तींना—त्यांतली एक वज्रकठोर व दुसरी कुसुमकोमल असूनहि—अधिक अधिक जवळ आणीत आहे.

पूर्वकाळीं गंधर्वनगरींत ( Ivory tower ) राहून ललितवाङ्मय निर्माण करणें अशक्य नव्हतें. काल्पनिक, काव्यात्म किंवा व्यक्तिनिष्ठ अशा भावनांची रंगत गंधर्वनगरींत बसूनहि प्रतिभासंपन्न लेखकाला साधत असे. पण आतां समाजापासून आलिप्त किंवा त्याच्याविषयीं उदासीन राहून साहित्यनिर्मिति करण्याचा काळ राहिलेला नाहीं. नुसती आत्मनिष्ठा ललितवाङ्मयाला यापुढें पूर्ववत् आधार देऊं शकणार नाहीं. त्या निष्ठेच्या जोडीला समाजनिष्ठा उदय पावली आहे. त्यामुळें साहित्याला कल्पनेइतकेंच वास्तवाचें आणि भावनेप्रमाणें विचाराचेंहि आकर्षण वाटूं लागलें आहे. विविध आणि विशाल सामाजिक जीवन हें जें ललित लेखकांना नवें स्फूर्तिस्थान मिळत आहे तेंच पत्रकारांच्या पराक्रमाचें उगमस्थान असल्यामुळें या दोन्ही प्रकारच्या सरस्वतीच्या उपासकांचें सहकार्य केवळ धंद्याच्याच नव्हे तर कलेच्या आणि ध्येयाच्या दृष्टीनेंहि यापुढें अगदीं अपरिहार्य होऊन बसलें आहे. हें सहकार्य कालांतरानें इतकें वृद्धिंगत होईल कीं दैनंदिन जीवन रंगविणारा कुशल कादंबरीकार म्हणवून घेण्यांत पत्रकाराला आनंद होईल आणि विविध सामाजिक अनुभूतींतून दृग्गोचर होणाऱ्या अमर मानवी जीवनाचें चित्रण करणारा चतुर पत्रकार म्हणून कुणी ललित लेखकाची संभावना केली तर त्याबद्दल त्याला खंत वाटणार नाहीं. नाहीं तरी या दोघांत जीवनाच्या दृष्टीनें एक वर्तमानाचा चित्रकार व दुसरा भविष्याचा शिल्पकार यापेक्षां दुसरें कुठलें अंतर आहे ?

पत्रकार आणि साहित्यिक यांच्या सहकार्याला केवळ तात्त्विक महत्व असतें तर त्यासंबंधीं इतका विस्तार मी केला नसता. पण तात्त्विकाहूनहि त्याचें व्यावहारिक महत्त्व मला आज अधिक वाटतें. यापुढचा काळ उघड उघड वृत्तपत्रांच्या वाढीचा आहे. पण कुठल्याही गोष्टीची स्वैर वाढ म्हणजे तिचा विकास नव्हे. प्रतिभा, योजकता आणि परिश्रम यांचा त्रिवेणीसंगम झाल्याशिवाय कुठल्याहि क्षेत्रांत विकास दृग्गोचर होत नाहीं.

आपल्या दक्षिण महाराष्ट्राकडेच नजर टाकली तरी वृत्तपत्रांची संख्या किती वेगानें वाढत आहे याची कुणालाहि सहज कल्पना येऊं शकेल. माझें बाळपण सांगलींत गेलें. त्यावेळीं वर्तमानपत्र फक्त पुण्यामुंबईतच निघं

शकतें असें वाटण्याजोगी या भागांतली वृत्तपत्रीय परिस्थिति होती. मी कॉलेजांत गेलों तेव्हां 'ज्ञानप्रकाशा'शिवाय पुण्यांत दुसरें दैनिक निघत नव्हतें. पण आतां कोल्हापुरांतसुद्धां 'पुढारी' सारखें कुशलतेनें संपादन केलेलें दैनिक निघत असून अनेक ठिकाणच्या साप्ताहिकाची संख्याहि डोळयांत भरण्याजोगी झाली आहे. जिल्हापत्रें किंवा तालुकापत्रें यांच्याशीं त्यांचें बरेंचसें साम्य असलें तरी 'वर्तमानपत्रकर्ता' हा विनोदी लेख लिहितांना श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्यापुढें त्यावेळीं असल्या पत्रकाराचा जो नमुना उभा होता त्याचें दर्शन यांच्यापैकीं बहुतेकांतून फारसें होत नाहीं ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. कोल्हटकरांचा हा पत्रकार मूळचा मिठाई विकणारा दुकानदार असतो. तो वर्तमानपत्र कां काढतो याचें कारण त्याच्याच शब्दांत देणें योग्य होईल. तो म्हणतो, 'हळुहळु माझ्या मिठाईच्या दुकानाची विक्री वाढत चालली. ती शेवटीं इतकी वाढली कीं पुडे बांधण्यास रद्दी कागद मिळण्याची मारामार पडूं लागली. ही जी कागदाची टंचाई पडूं लागली, तिच्यामुळेंच वर्तमानपत्र काढण्याचा विचार प्रथमतः माझ्या मनांत आला व तेव्हांपासून तो माझ्या मनांत घोळूं लागला. शेवटीं वर्तमानपत्रांत मला फारशी प्राप्ती झाली नाहीं तरी त्यांत मला माझ्या मिठाईच्या दुकानाची जाहिरात देतां येईल, वर्तमानपत्राचे अंक पुडे बांधण्यास उपयोगी पडतील व अशा प्रकारें एका मार्गानें दोन कामें साधतील असा मी विचार केला व तो अंमलांतहि आणला.' अशा पत्रकाराची पत्रसंपादनाची कल्पनाहि अजब असली पाहिजे हें उघड आहे. आपलें वर्तमानसार चटकदार करून देण्याची त्याची योजना किती अभिनव आहे तें पहा. तो म्हणतो, 'माझ्या पत्रांतील वर्तमानसार जितकें मनोरंजक करवेल तितकें करण्याकडे माझा कल आहे. यामुळें माझे वाचक फार खूप असतात. वाचकांस रंजविण्याकरितां वेळेस मला पदरचें तिखटमीठ जरी लावावें लागलें तरी त्या पदरमोडीला माझी एका पायावर तयारी असते. यामुळें माझ्या पत्राचें फाइल चाळल्यास खालीलप्रमाणें माहिती जागोजाग सांपडेलः 'भोळेगांव येथील प्रसिद्ध देवालयांतील मारुतीस रामनवमीचे दिवशीं दरदरून घाम सुटला. हें दुश्चिन्ह आहे असा ज्ञात्यांचा अभिप्राय आहे. हा चमत्कार पाहण्यास खूप गर्दी जमली होती. प्रत्येकापासून एक एक पैसा

घेऊन आंत सोडण्यांत येई. ही रक्कम जमतां जमतां शंभर रुपयांवर गेली आहे. मारुतीच्या निढळाच्या घामाच्या या रकमेचा विनियोग संकटनिवारणार्थ ब्राह्मणसंतर्पण करण्यांत होणार आहे. धर्मद्वेष्ट्यांचें इकडे लक्ष जाईल काय ?' 'लंबेडो येथें धरणीकंपाचा धक्का बसला. त्यामुळें जमिनीला जी एक मोठी भेग पडली तिच्यांतून शेषाचें मस्तक दिसत होतें. शेषाच्या मस्तकावरील मण्यामुळें त्या भेगेंत चोहोंकडे प्रकाशच झाला होता. या उप्पर आपलीं पुराणें खोटीं आहेत असें म्हणण्याचें धाडस कोण करील ? ' अशा बातम्या देणारा हा पत्रकार आपल्या धंद्यांतलें गुपित म्हणून पुढें वाचकांच्या कानांत हळुच सांगतो ' वरील गांवें केवळ कपोलकल्पित आहेत, हें धूर्त वाचकांनीं ताडलेंच असेल !'

कोल्हटकरांनी रेखाटलेलें पत्रकाराचें हें विनोदी चित्र आपल्या आवतीभोंवतीं कुठेंच आढळणार नाहीं असें मात्र नाहीं. अलीकडच्या काळांतली एक असत्य वाटणारी सत्यकथाच सांगतों मी आपल्याला. तिच्यावरून काळाबरोबर दांभिकता आपलें रूप बदलते, पण तिचें अस्तित्व मात्र नाहींसें होत नाहीं, याची आपणांला पुरी कल्पना येईल. एके दिवशीं अशाच एका वृत्तपत्रांत एक बातमी छापून आली. त्या गांवांतल्या कांहीं प्रमुख स्त्रियांनीं त्या वृत्तपत्राच्या संपादकाच्या अध्यक्षतेखालीं त्याच्याच कचेरींत सभा भरविल्याची वार्ता होती ती ! त्या सभेचा उद्देश महिलांच्या उन्नतीकरतां एक टोलेजंग संस्था स्थापन करण्याचा किंवा असाच कांहींतरी होता. त्या सभेला ज्या स्त्रिया हजर होत्या म्हणून छापण्यांत आलें होतें त्यांना या सभेचा पत्ता प्रथम त्या वर्तमानपत्रांतल्या बातमीवरूनच लागला. चकित होऊन त्या एकमेकीकडे चौकशी करूं लागल्या. पण अशी सभा झाल्याचें कांहीं केल्या कुणालाच आठवेना. आपणा सर्वांचा एकदम स्मृतिभ्रंश झाला कीं काय अशी त्यांना शंका येऊं लागली. शेवटीं त्यांतल्या एका चाणाक्ष भगिनीनें या बातमीचा उगम कुठें आहे याचा अचूक तर्क केला. कांहीं दिवसांपूर्वीं त्या सर्व मैत्रिणी त्या वृत्तपत्राच्या कचेरीवरून फिरायला चालल्या होत्या. पावसाचें मुळींच चिन्ह नसल्यामुळें बरोबर छत्र्या घेण्याची जरूर त्यांच्यापैकीं कुणालाच भासली नव्हती. पण पाऊस हा सर्व लहरी लोकांचा राजा आहे. स्त्रीदाक्षिण्य हा शब्दसुद्धां त्याच्या कोशांत नाहीं. त्याचवेळीं

त्याला पृथ्वीवर अभिषेक करण्याची लहर आली. संरक्षणाकरतां त्या बिचाऱ्या बायकांनीं जवळच असलेल्या वृत्तपत्रकचेरीच्या आडोशाचा आश्रय घेतला. हें पाहून पत्रकारमहाशयांनीं त्यांना आंत बोलावण्याचें सौजन्य दाखविलें; त्यांना बसायला खुर्च्या दिल्या! कदाचित् या विदुषींना चहाहि दिला असेल त्यांनीं! पाऊस ओसरतांच त्या भगिनी सदरहू सद्गृहस्थांचे आभार मानून निघून गेल्या. या एवढ्याश्या प्रसंगांतून केवळ त्या पत्रकाराच्या कल्पकतेमुळें या बातमीचा जन्म झाला. युद्धकालांत अन्नाची टंचाई जाणवूं लागतांच 'अधिक धान्य पिकवा' असा संदेश जसा सरकार देऊं लागलें, त्याप्रमाणें मशारनिल्हे गृहस्थांच्याकडे कुणी संदेश मागायला गेल्यास 'अधिक बातम्या पिकवा' असेंच ते सागतील यात मला संशय वाटत नाहीं. दुसऱ्या एका विद्वान संपादकांचें इंग्रजी ज्ञान असेंच तुम्हां-आम्हांला चकित करून सोडणारें आहे. कुणी तरी नव्या बुटाची किंमत विचारताच साडेचार रुपये असा गांवढळ मराठी शब्दप्रयोग न करतां 'हाफ् पास्ट फोर' असें ऐटबाज इंग्रजी उत्तर त्यांनीं आपल्या पृच्छकाला दिलें होतें.

हे नमुने अपवादात्मक आहेत हें मी आनंदानें मान्य करतों. आपल्या या छोट्या भागांतलीं दोन-तीन पत्रें बाहेरसुद्धा कौतुक व्हावें अशा रीतीनें संपादन केलीं जात आहेत ही अभिमानाची गोष्ट आहे. बहुजनसमाजाला जवळच्या वाटतील अशा सामान्य घटनांचा अग्रलेखाकरतां उपयोग करून घेण्याचें चातुर्य, विविध वार्तांची परिणामकारक मांडणी, पक्षनिष्ठा सांभाळूनहि सार्वजनिक कल्याणाच्या गोष्टींचा पुरस्कार करण्याची प्रवृत्ति, यापुढें दक्षिणी संस्थानें किंवा दक्षिण महाराष्ट्र असल्या छोट्या विभागाची सर्व सुखदुःखें राष्ट्राच्या किंबहुना मानवतेच्या सुखदुःखांबरोबर निगडित होऊं घातलीं आहेत याची जाणीव होऊन प्रचलित प्रश्नांचें व्यापक दृष्टीनें केलेलें विवेचन, इत्यादि गुणांचा ज्यांच्यांत अढळ होतो अशीं वृत्तपत्रें दक्षिण महाराष्ट्रांत नाहींत असें नाहीं. आजच्या सामाजिक प्रगतीला तीं चांगलाच हातभार लावीत आहेत.

याचा अर्थ आपल्या भागांतलीं बहुसंख्य वृत्तपत्रें उच्च पातळीवरून कार्य करीत आहेत असा मात्र नाहीं. अनेक वृत्तपत्रें कां निघत आहेत याचें

वाचकाना कोडेंच पडत असेल ! तीं पाहून धर्मशाळांची इटकून आठवण होते. वृत्तपत्र हा इतर अनेक धंद्यांप्रमाणें जर केवळ एक खाजगी धंदा असता, तर अशा वृत्तपत्रांकडे दुर्लक्ष करणें उचित झालें असतें. पण आर्थिक दृष्ट्या तो खाजगी धंदा असला तरी सामाजिक दृष्ट्या ती आज एक प्रचंड व प्रभावी शक्ति आहे. सत्ताधाऱ्यांचीं फर्मानें, पूज्य पुढाऱ्यांचे संदेश आणि प्रतिभाशाली साहित्यिकांचे संस्कार सामाजिक मनावर प्रभाव गाजवीत असतात हें कांहीं खोटें नाहीं. पण त्यांच्यापेक्षा अधिक सूक्ष्म आणि अधिक परिणामकारक रीतीनें क्षणाक्षणाला जनमनाला आकार देण्याची शक्ति जर कशांत असेल तर ती वृत्तपत्रांत आहे. सत्तेचें सामर्थ्य कायद्यांत असतें, पुढाऱ्यांची शक्ति त्याच्या व्यक्तित्वाच्या माहात्म्यांत असते आणि साहित्याची संस्कारक्षमत त्याच्या अभिजात सौंदर्यांत व सहृदयतेंत असते. पण या वैशिष्ट्यांमुळेंच सर्वसामान्य समाज त्यांच्याशीं संपूर्णपणें समरस होऊं शकत नाहीं. तो भीतीनें कायदा पाळतो, भक्तीनें पुढाऱ्यांकडे पाहतो आणि आदरानें अथवा आवडीनें साहित्याचीं पारायणें करतो. पण त्याला आपलें हृदय याच्यापैकीं कुणापाशींच उघडें करून दाखवितां येत नाहीं. फक्त पत्रकार हाच त्याचा जिवलग मित्र होऊं शकतो. त्याचीं लहान मोठीं दुःखें तोच अविलंबानें आणि अभिनिवेशानें वेशीवर टांगतो. पत्रकारानें मनावर घेतलें नाहीं तर सामान्य मनुष्यानें एकांतांत गाळलेले अश्रु जागच्या जागीं सुकून जातील, दारिद्र्यानें पिळवटलेल्या त्याच्या आंतड्यांतून निघणारे करुण सूर वाऱ्यावरच विरतील. पत्रकारांच्या अपूर्व सामर्थ्यामुळेंच त्या सुरांतून क्रांतिगीत निर्माण होत असतें.

बहुजनसमाजाच्या जिवलग मित्राची ही भूमिका आपल्यापैकीं किती पत्रें निष्ठेनें आणि कसोशीनें पार पाडीत आहेत, या प्रश्नाचें प्रामाणिक उत्तर देण्याचा प्रत्येक पत्रकारानें प्रयत्न केला पाहिजे. उपदेशाइतकी सोपी आणि आत्मपरीक्षणाइतकी कठिण अशी गोष्ट जगांत दुसरी कुठलीच नाहीं, हें मी जाणतों. पण व्यक्तीप्रमाणें सामाजिक शक्तीचा विकासहि आत्मपरीक्षणाच्या अभावीं कुंठित होतो. म्हणून ही अप्रिय पण अंतीं पथ्यकर अशी सूचना मी करीत आहें. श्री. ना. धों. ताम्हनकर यांनीं जे 'निवाडे' लिहिले आहेत त्यांत यमधर्मापुढें उभा राहणारा पत्रकार आहे कीं नाहीं हें मला आठवत नाहीं. पण लोकसेवेचीं बिरुदें उठल्या-सुटल्या मिरविणाऱ्या कांहीं

लहान-मोठ्या पत्रकारांची चित्रगुप्तापुढें होणारी उलट तपासणी अत्यंत मनोरंजक होईल अशी माझी खात्री आहे. दंभस्फोट हेंच आपलें जीवित-कार्य आहे असा आक्रोश करणारा एखादा पत्रकार स्वतः किती दांभिक असूं शकतो याचा तिथेंच उलगडा होईल. विविध वृत्तपत्रांतून ज्या वीर-श्रीच्या गर्जना आणि नव्या जगाच्या वल्गना आपण वारंवार ऐकत असतों त्यांचें सत्यस्वरूप कोणत्या प्रकारचें आहे, कुणाला कुठला पैसा बोलवत आहे, कुणाला कोणत्या अधिकाऱ्याची नजर नाचवीत आहे, कुणाच्या शब्दांमागें अहंकारतृप्तीचें पोकळ समाधान आहे आणि कुणाची वाणी शुद्ध लोकहितबुद्धीनें प्रेरित झाली आहे, याचा निर्णय तिथेंच होऊं शकेल.

जीवनाच्या कुठल्याहि क्षेत्रांत सत्याचा पूजक आणि मानवतेचा सेवक होणें हें कांहीं येरागबाळाचें काम नाहीं. पण ध्येयवादी पत्रकाराला—त्याचें कार्यक्षेत्र कितीहि लहान असलें तरी—हें ध्येय डावलून चालणार नाहीं. या जगांत सत्याच्या एकनिष्ठ पूजकाला सॉक्रेटिसाप्रमाणें विषाचा प्याला हंसत-मुखानें घ्यावा लागतो. मानवतेच्या प्रामाणिक सेवकाला शेवटीं बुद्ध, ख्रिस्त, टॉलस्टॉय किंवा गांधीजी यांची भूमिका घेतल्याशिवाय गत्यंतरच राहत नाहीं. सर्वसामान्य पत्रकार किंवा साहित्यिक यांच्यामध्यें इतका प्रखर ध्येय-वाद असावा अशी अपेक्षा करणें सर्वस्वीं चुकीचें होईल. पण त्याचबरोबर त्यांचीं जीवनमूल्यें प्रचलित व्यावहारिक मूल्यांहून अधिक उच्च आणि उदात्त असलीं पाहिजेत असा हट्ट धरणें अनुचित होईल काय ?

नाहीं, मुळींच नाहीं. आपल्या प्रत्येक शब्दानें कळत नकळत वृत्तपत्रें सामा-जिक जीवनाला वळण लावीत असतात हें एकदां मान्य केल्यावर आणि आपल्या उद्यांच्या भाग्याचे शिल्पकार म्हणून समाज त्यांना जें सन्मा-ननीय स्थान देतो तें त्यांनीं स्वीकारल्यानंतर पत्रकारांनीं ध्येयशून्य राहणें अथवा ध्येयाचा बुरखा पांघरून त्याच्या आड स्वार्थाचा संसार मांडणें हा मोठा सामाजिक गुन्हा आहे.

आजच्या काळांत ध्येयवादावांचून चांगला पत्रकार निर्माण होऊं शकणार नाहीं हा माझ्या वरील विवेचनाचा निष्कर्ष एकांगी आहे असें अनेकांना वाटेल. वृत्तपत्र हा धर्म नाहीं, तो इतर धंद्यांप्रमाणें एक धंदा आहे, असे उद्गारहि त्यांच्या तोंडून निघतील. तो धंदा आहे किंबहुना धंद्याप्रमाणेंच ती

एक कलाहि आहे, हें मी मुळींच नाकबूल करीत नाहीं. उलट मी असें म्हणेन कीं धंद्याची दृष्टि आणि कलेची सृष्टि यांचा संगम साधण्याकरितां प्रामाणिक आणि आटोकाट प्रयत्न करणें हें सुद्धां पत्रकारच्या ध्येयवादाचें एक प्रमुख अंग आहे.

केवळ कलेच्या दृष्टीनें आपल्या भागांतल्या वृत्तपत्रांकडे पाहिलें तर मुद्रणसौंदर्याचा अभाव प्रथमच जाणवल्यावांचून रहात नाहीं. महायुद्ध हेंच कांहीं या गोष्टीचें एकमेव कारण नाहीं. सुगरिणीची टापटीप अठरा विश्वे दारिद्र्यांत आणि दोन खोल्यांच्या संसारातहि दिसून येते. इतर कलांप्रमाणें मुद्रणकलेंतहि कष्टाळु आणि कल्पक माणसांच्या कर्तृत्वाला जागा असतेच असते! पण अनेक पत्रकारांना जिथें मुद्रणांतल्या सौंदर्यदृष्टीची जाणीवच नसते, तिथें ते तिची जोपासना कशी करणार? महाराष्ट्रांतली अनेक पत्रें पाहतांना चित्रविचित्र पोषाख करून फिरायला जाणाऱ्या पुणेरी पेन्शनराची मला हटकून आठवण होते. दारिद्र्य हा व्यक्तीचा काय किंवा संस्थेचा काय गुन्हा होत नाहीं. पण गरिबीच्या ऐसपैस पांघरुणाखालीं सौंदर्यदृष्टीची उपेक्षा करणें हें कुठल्याच कलाक्षेत्रांत क्षम्य मानलें जाणार नाहीं.

छपाईचें सौंदर्य सोडून तिच्या शुद्धतेकडे वळलें तरी तिथेंहि हाच कटु अनुभव दत्त म्हणून पुढें उभा राहतो. हल्लींच्या विद्यार्थ्यांचें मराठी शुद्ध-लेखन फार अशुद्ध असतें अशी शिक्षक–परीक्षकांची नेहमीं ओरड ऐकू येते. या दोषाचें खापर अनेकांच्या डोक्यांवर फोडतां येण्यासारखें असलें तरी याबाबतींत वृत्तपत्रें कांहीं कमी सदोष ठरत नाहींत. आपल्या दक्षिण महा-राष्ट्रांतल्या एका पत्रानें पत्रकार–परिषदेच्या अध्यक्षांचें स्टेशनावरील स्वागत रसभरित रीतीनें वर्णन करीत असतांना 'त्यांना पुष्पगुच्छ देण्यांत आले' याच्याऐवजीं 'त्यांना पुच्छगुच्छ देण्यांत आले' असें छापलें होतें. परवांच एका 'रंगभूमि गाजवून सोडलेल्या' मराठी नाटकाची 'रंगभूमि गांजवून सोडणारें' म्हणून पुण्याच्या एका साप्ताहिकांत संभावना करण्यांत आली होती. चिंता ही अनुस्वारयुक्त चिता आहे असें म्हणून तिची दाहकता वर्णन करणाऱ्या संस्कृत सुभाषितकारानेंसुद्धां या अनुस्वाराच्या लीलेचें कौतुक केलें असतें! गेल्या दहा वर्षांतलीं वृत्तपत्रें वाचून माझें असें मत

झालें आहे कीं सर्व वर्तमानपत्रांतले असले मुद्रणचमत्कार एकत्रित करून व त्यांच्यावर मल्लिनाथी करण्याकरतां रांगणेकर किंवा बांदेकर यांची नेमणूक करून 'मुद्राराक्षस' नांवाचें एखादें रविवारचें साप्ताहिक काढलें तर त्याचा तडाखेबंद खप झाल्याशिवाय राहणार नाहीं.

मजकुराच्या शुद्धतेनंतर त्याच्या मांडणीचा प्रश्न येतो. या बाबतींत ज्यांना सामान्यतः जिल्हापत्रांच्या पंक्तींत बसविता येईल अशा आपल्या भागांतल्या साप्ताहिकांची मोठी कुचंबणा होते हें कबूल केलेंच पाहिजे. मुंबई–पुण्याच्या दैनिकांनीं राजकारणाचा मक्ता घेतलेला आणि तिथल्या साप्ताहिकांनीं मनोरंजनाचा प्रांत काबीज केलेला. शिवाय आपलें साप्ताहिक ज्या संस्थानांत किंवा शहरांत निघतें तिथल्या स्थानिक संसारात त्यानें भाग घेतला नाहीं तर तिथल्या लोकांना त्याच्याविषयीं आपलेपणा उत्पन्न होत नाहीं. इतके खडक चुकवून नौका वल्हविण्याची कुशलता विरळ आढळली तर त्यात नवल नाहीं. आपल्या अनेक साप्ताहिकात तोच तोच शिळा मजकूर, त्याच त्याच बिनमहत्त्वाच्या बातम्या, आणि सभा-समारंभांचीं तींच तींच औपचारिक नीरस वर्णनें आढळल्यामुळें वाचक मनात रुष्ट झाल्यावांचून रहात नाहीं. विशिष्ट ध्येयानें प्रेरित झालेल्या वृत्तपत्नांत हा दोष साहजिकच कमी होतो. पण ध्येयाचा प्रश्न बाजूला ठेवला तरी धंदा या दृष्टीनें साप्ताहिक वृत्तपत्रें जर आपल्याला यशस्वी करायचीं असलीं तर प्रत्येक पत्रकारानें आपलें वैशिष्ट्य निर्माण करण्याचा कसोशीनें प्रयत्न केला पाहिजे, असें मला वाटतें. दैनिकांतून उसन्या आणलेल्या जागतिक किंवा राष्ट्रीय राजकारणाच्या शिळ्या कढीला ऊत आणल्यामुळें कांहीं वाचक ती भुरके मारून संपविणार नाहींत. ज्यांचें कार्यक्षेत्र मर्यादित आहे अशा पत्रांनीं ही बहिर्मुख दृष्टि सोडून देऊन अंतर्मुख झालें पाहिजे. आपलें संस्थान किंवा आपला जिल्हा फार लहान असेल. तिथें खून, अपघात वगैरे क्षोभकारक घडामोडी फारशा घडत नसतील. पण डोळस मनुष्याला, चौकस लेखकाला आणि कल्पक पत्नकाराला या टीचभर क्षेत्रांतहि आपल्या वाचकांनीं न पाहिलेल्या आणि न ऐकलेल्या अनेक महत्त्वाच्या घटनांचें आणि सामाजिक प्रश्नांचें सहज दर्शन होणें शक्य आहे. त्यांचें चित्रण आपण करायचें नाहीं तर कुणी करायचें ? मोठमोठ्या शहरांतलीं वर्तमानपत्रें दुर्बिणी लावून पंचखंड

पृथ्वीचें निरीक्षण खुशाल करूं देत. आपलें जग चिमुकलें असलें तरी तें सूक्ष्म-दर्शक यंत्रामधून पाहण्याचा, त्यांतल्या जीवनाचा सुसंगत अर्थ लावण्याचा आणि तें निर्मळ व विकसित करण्याचा आपण प्रयत्न करूं या. आपला देश दरिद्री आहे म्हणून आपण नेहमीं आक्रोश करतों. पण त्या दारिद्र्याचें यथार्थ स्वरूप आपल्या वाचकांना दिसावें आणि त्या भयाण दृश्यानें अस्वस्थ होऊन त्यांनीं क्रांतिप्रवृत्त व्हावें, असे आपण कितीसे प्रयत्न करतों ? उन्हातान्हांतून वणवण करणारा हा पोस्टाचा शिपाई पहा. स्वतःच्या तान्ह्या मुलाच्या तोंडात घालायला घरांत दुधाचा थेंब नसतांनाहि तोंडावर हंसूं आणून तुमच्या आमच्या मुलांना ज्ञानामृत पाजणारा हा दुर्दैवी प्राथमिक शिक्षक घ्या. विद्येचा डोंगर पोखरून ज्याच्या हातीं फक्त व्यवहाराचा उंदीर लागतो असा हा दुर्दैवी दुय्यम शिक्षक बघा ! हा रातपाळीचा मजूर–हा बाजाराकरतां दहा दहा मैलावरून चालत येणारा लोणीविक्या–चार रुपड्यां-साठीं पन्नास मैलांवरून आलेला हा गरीब गाडीवान–ही भाजीवाली–तो हमाल–हीं विविध मुकीं माणसें–त्यांच्या धडपडीमागचें आर्थिक जीवन–त्यांचीं जिव्हाळ्याचीं सामाजिक सुखदुःखें–जो पाहील त्याला येथें विश्वरूप दिसेल !

मित्रहो, या सूक्ष्मदर्शक यंत्रांतून तुम्हाला हें जें नवें विश्व दिसेल त्याचा साक्षात्कार खेड्यापाड्यातील साक्षर वाचकांना करून देणें, बहुजनसमाजाच्या दैनंदिन जीवनांतलें हास्य, त्यांतले अश्रु, त्यांतलें दैन्य, त्यांतलें शौर्य, त्यांतले कलह, त्यांतल्या समस्या हें सर्व आपल्या वाचकांपर्यंत नेऊन पोंचविणें, त्यांच्या सुप्त भावना जागृत करणें, त्याच्या बधिर विचारशक्तीला चेतना आणणें आणि सामाजिक दृष्ट्या निष्क्रिय अशा त्याच्या मनाला कार्यप्रवृत्त करणें हें कार्य काय लहान आहे ?

अशा अनेक मार्गांनीं आपल्या पत्रांतल्या मजकुराचा जिव्हाळा आणि त्याची वाचनीयता छोट्या पत्रकारांना सुद्धां वाढविता येईल.मोठ्या पुढाऱ्यांचीं भाषणं आपल्या पत्रांतली जागा भरून काढण्याकरितां द्यायचीं नसतात, तर त्यांचा संदेश सामान्य वाचकांच्या अंतःकरणाला जाऊन भिडावा म्हणून तीं उद्धृत करायचीं असतात, ही दृष्टि अजून आपल्याकडे दुर्लभच आहे. या भाषणांना टीका, विवेचन, रसग्रहण इत्यादिकांची जोड दिल्याशिवाय सर्वसामान्य मनुष्याला त्यांतलें मर्म कसें कळूं शकेल ? आपल्याभोंवतीं

प्रत्येक धंद्यांतलीं हुषार माणसें नित्य वावरत असतात. त्यांचे अनुभव अनेकदां अमोल वाटतात. त्या अनुभवांतूनच समाजाचें बदलतें रूप स्पष्ट पहावयाला मिळण्याची शक्यता असते. पण वकील, डॉक्टर, मजूर, सराफ, प्रोफेसर, शेतकरी किंवा कापड-दुकानदार यांच्या मुलाखती गांधी-जिनांच्या मुलाखतीइतक्याच उपयुक्त आहेत हें आपल्याला आधी पटलें पाहिजे. यापुढें साहित्यिक आणि पत्रकार यांचें सहकार्य घडलें पाहिजे असें जें मी आरंभीं म्हणालों तें याच दृष्टीनें.

आपल्या पत्रांत अशा प्रकारचें आकर्षक व विचारप्रवर्तक वैचित्र्य आणायचें इकडच्या एखाद्या संपादकानें ठरविलें तरी त्याला समर्थ लेखक मिळणार नाहींत अशी शंका आपल्या मनांत येण्याचा संभव आहे. ती सर्वस्वीं निराधार आहे असें मी म्हणत नाहीं. पण त्याबरोबरच असल्या कल्पना अंमलांत आणण्याचा प्रयत्न करणाऱ्या योजकाइतके कांहीं असले लेखक दुर्लभ नाहींत असें म्हणण्याचा मोह मला होत आहे. शिक्षक, वकील, डॉक्टर वगैरे बुद्धिजीवी वर्गांत अनेकांना लेखनाची हौस असते. त्या हौसेचा पत्रकारांनीं मर्मज्ञतेनें उपयोग करून घेणें अवश्य आहे. त्यांतल्या कित्येकांचा एकेका विषयाचा मोठा खोल अभ्यास असतो. कांहींचें वाचन आपण आश्चर्य करावें इतकें विविध असतें. पण हरतऱ्हेचा कच्चा माल आपल्या देशांत पैदा होत असूनहि तो जसा अद्यापि दरिद्री राहिला आहे, तशीच पुण्यामुंबईबाहेरच्या बहुतेक वृत्तपत्रांच्या वाङ्मयसंसाराची स्थिति आहे. या स्थितींत खालील उपायांनीं थोडीफार सुधारणा होण्याची शक्यता आहे.

[१] प्रत्येक पत्रांत स्थानिक आणि बाहेरील घडामोडींबद्दलचा मजकूर येणें अपरिहार्य असलें तरी त्याच्या जोडीनें आपलीं विशिष्ट अशीं सदरें—मग तीं प्रचारात्मक असोत, विचारात्मक असोत अथवा रंजनपर असोत—त्या पत्रानें निर्माण केलीं पाहिजेत.

[२] एकदोन ठराविक माणसांनीं सर्व मजकूर खरडायचा, तोहि दैनिकांनीं चर्वितचर्वण केलेल्या त्याच त्याच विषयांवर असायचा आणि तें लेखन सुद्धां कायम ठशाच्या बोजड भाषेंत करायचें, ही पद्धति आपण

तावडतोब सोडली पाहिजे. मराठी वाङ्मयाविषयीं समाजांत दिवसेदिवस अधिक प्रेम उत्पन्न होत आहे. साहित्यपरिषदेच्या विशारद आणि प्राज्ञ या परीक्षांना विद्यार्थी, शिक्षक किंवा मध्यम वर्गांतल्या सुखवस्तु स्त्रियाच बसत नाहींत. त्यांच्या उमेदवारांत पेन्शन घेतलेल्या वृद्धांप्रमाणें किराणा मालाच्या दुकानात कारकुनी करणारे लोकहि आहेत. साहित्याच्या हौशी अभ्यासकांच्या या वाढत्या वर्गांतून अनेक साहाय्यक पत्रकारांना निर्माण करून घेता येतील. केवळ भाषा आणि मांडणी यांच्या नावीन्यामुळें सुद्धा वृत्तपत्रीय मजकुराला निराळी आकर्षकता येऊं शकते.

[३] संस्कृतशब्दप्रचुर अथवा घटपटादि खटपटीची आठवण करून देणारा जाडा अग्रलेख जो लिहितो त्याला संपादक म्हणतात, ही संपादकाची व्याख्या आतां फार जुनीपुराणी झाली. गांधीलमाशीप्रमाणें मधमाशीची शक्तिहि आमच्या संपादकांच्या अंगीं असायला हवी. आपल्या वाचकाला विचारप्रवृत्त करणें, त्याच्या जीवनदृष्टीचें क्षितिज विशाल करणें, त्याच्या मनांतला सद्भावनेचा नंदादीप अखंड तेवत ठेवणें, हें पत्रकाराचें एक प्रमुख कार्य आहे. त्याकरितां त्यानें बहुश्रुत राहिलें पाहिजे. समाजाला सांगण्यासारख्या कितीतरी गोष्टी जगात हरघडी घडत असतात, पावलोपावलीं निर्माण होत असतात; पण आपण आळसाने आणि अज्ञानानें त्यांच्याकडे दुर्लक्ष करतों. विज्ञान, तत्त्वज्ञान आणि वाङ्मय या महानद्यांना जगांत नित्य नवे पूर येत आहेत. पण त्यांचे कालवे काढण्याचे कष्ट आमच्यापैकीं किती लोक करतात ? काकासाहेब कालेलकरांनीं शिफारस केल्यामुळें 'We walk alone' ही एका दुर्दैवी महारोग्याची आत्मकथा मीं नुक्तीच वाचली. शास्त्र या नांवाखालीं मनुष्य किती अशास्त्रीय समजुतींना कवटाळून बसतो आणि असल्या अभागी जिवांना अज्ञानामुळें आपण किती अमानुषतेनें वागवितों याची हें पुस्तक वाचतांना मला पूर्ण कल्पना आली. या पुस्तकांतला महत्त्वाचा भाग तत्काळ आपल्या समाजाच्या तळापर्यंत गेला पाहिजे. पत्रकारावांचून दुसरा कोण त्याचा प्रसार करणार ? दुसरें उदाहरण जे. बी. प्रीस्टलेच्या 'Three men in uniform' या कथेचें आहे. युद्धावरून परत आलेल्या तीन मित्रांची ही गोष्ट आहे. त्यांतला एक उच्च वर्गांतला दुसरा मध्यम वर्गांतला आणि तिसरा खालच्या वर्गांतला असतो. रणमैदानावर

मृत्यु समोर विकट हास्य करीत असतांना त्यांच्यामधलें सर्व अंतर लोप पावतें. ते तिथे जानीदोस्त होतात. जीवश्च कंठश्च मित्र म्हणूनच ते मायभूमीला परत येतात. जगांतल्या हुकूमशाहीप्रमाणें झाडून साऱ्या सामाजिक विषमतेचाहि या युद्धांत शेवट झाल्याशिवाय राहाणार नाहीं ही त्यांच्या अंतःकरणांत निर्माण झालेली स्वप्नाळु श्रद्धा पहिल्याच दिवशीं येणाऱ्या कटु अनुभवांनीं भंग पावूं लागते. त्यांच्या या करुण निराशेचें सूक्ष्म चित्रण प्रीस्टलेनें केलें आहे. हें चित्र आज आपल्यालाहि मार्गदर्शक होईल असेंच आहे. पण पत्रकाराशिवाय त्याचा चटकन् परामर्श कोण घेणार ? हा संदेश सामान्य मनुष्यापर्यंत कसा पोंचणार ? तिसरें उदाहरण 'Guide to the new world : A hand-book of constructive world-revolution' या अगडबंब नावानें प्रसिद्ध झालेल्या एच्.जी. वेल्सच्या दीडशें पानांच्या पुस्तकाचें. त्या पुस्तकांतल्या अनेक विधानांचा वृत्तपत्रांनीं खरपूस समाचार घेणें आवश्यक होतें. त्यांतल्या त्यांत 'हिंदुस्थान हें राष्ट्र आहे काय ?' ( Is India a nation ? ) या लेखांत विपरीतपणा अधिक आहे कीं उर्मटपणा अधिक आहे हें कळत नसल्यामुळे पत्रकारांनीं सपाट्यालाच त्याला सलामी द्यायला हरकत नव्हती. या लेखांत उदारमतवादी, समाजवादी वगैरे वगैरे विशेषणांनीं पूर्वकाळीं अलंकृत झालेले वेल्ससाहेब गांधीजींविषयीं म्हणतात, 'जगांतल्या क्रांति-कारकांनी गांधींना खिजगणतींत घ्यायचें सुद्धां कारण नाहीं. थोडा उपद्रव देण्याची शक्ति आणि कांहीं अमेरिकन माणसांची अंध भक्ति एवढेंच काय तें या महात्म्याचें भांडवल आहे. लहर लागेल तेव्हा आमच्या दरवाज्यांत गांधींनी प्राणांतिक उपोषण खुशाल सुरू करावें. आम्ही त्यांना मुळींच हरकत करणार नाहीं. असल्या उपोषणाकरता आमच्या दाराची निवड करून आमच्या हालचालीच्या हक्कांवर ते अतिक्रमण करीत असले तरी उपास करून प्राण सोडण्याच्या त्यांच्या हक्काला आम्ही जोराचा पाठिंबा देऊं. त्यांची असहकारिता आणि तत्सदृश सर्व जुनाट कल्पना इसवी सनापूर्वीच्या जगाला शोभणाऱ्या आहेत.' नवें जग निर्माण करण्याच्या गप्पा झोडणाऱ्या उर्मट गोऱ्या पंडितांची ही भाषा आपण पत्रकारांनीं काय मुकाट्यानें ऐकून घ्यायची ?

आपल्या वृत्तपत्रांना आपलें अंतरंग अधिक सकस आणि आकर्षक कसें करतां येईल याचें हें अगदीं तोकडें व ओझरतें दिग्दर्शन आहे. मात्र

यावरून मराठी वृत्तपत्रांनीं गेल्या पंचवीस वर्षांत कांहींच प्रगति केली नाहीं असा जर कुणी ग्रह करून घेईल तर तो सर्वस्वीं चुकीचा ठरेल. दैनिक वृत्तपत्र ही एक अडगळीची खोली आहे, असें वाटायला लावणारीं कांहीं पत्रें जरी अजूनहि प्रसिद्ध होत असलीं तरी 'संग्राम' व 'प्रभात' हीं मुंबईचीं आणि 'प्रभात' व 'काळ' हीं पुण्याचीं पत्रें आपापल्या आकर्षक मांडणीनें सहज वाचकांच्या डोळ्यांत भरतात. प्रचार कशाचा करावा ही गोष्ट प्रत्येकाच्या प्रामाणिक निष्ठेवर अवलंबून आहे. पण तो कुशलतेनें व हिरीरीनें कसा करावा याचा नमुना म्हणून 'लोकयुगा'कडे बोट दाखवायला हरकत नाहीं. अनुरंजनाच्या अगदीं खालच्या पातळीवर न उतरतांहि मजकुरांत विविधता आणण्याचा 'मौजे'चा गेल्या दीडदोन वर्षांतला प्रयत्न अभिनंदनीय आहे. जावडेकर, गाडगीळ, घोरपडे इत्यादि संपादकांची विद्वत्ता आणि तळमळ बहुजनसमाजांत विचारजागृति करण्याच्या कामीं चांगला हातभार लावीत आहे. टिळक-आगरकरांची बुद्धि, त्याग आणि निष्ठा यांची उज्ज्वल परंपरा राजकीय दृष्ट्या प्रतिस्पर्धी म्हणून समोरासमोर उभ्या राहणाऱ्या आपल्या कांहीं वृत्तपत्रांतून सारख्याच तेजस्वीपणानें संवर्धित होत आहे ही गोष्ट नमूद करताना कुणाला आनंदयुक्त अभिमान वाटणार नाहीं ?

दक्षिण महाराष्ट्रांतल्या वृत्तपत्रांनींहि आपण याच श्रेष्ठ लढाऊ परंपरेचे वारस आहोंत याचें स्वत:ला केव्हांहि विस्मरण होऊं देता कामा नये. ध्येयवाद हा वृत्तपत्रांचा आत्मा असला पाहिजे या विधानामध्यें हाच अर्थ अभिप्रेत असतो. घरच्या छापखान्याला काम मिळावें म्हणून, सरकार आणि चित्रपट यांच्या जाहिराती चरितार्थाला चांगल्या उपयोगी पडूं शकतात म्हणून, ओसाड गांवांत एरंड बळी या न्यायानें आपली टिमकी वाजविता येते म्हणून किंवा असेच दुसरे कांहीं अंत:स्थ हेतु मनांत धरून वृत्तपत्रव्यवसायांत शिरणें याच्याइतकें भयंकर सामाजिक पाप दुसरें कुठलेंहि नसेल. प्रेम, प्रतिभा, पांडित्य आणि प्रज्ञा या चार आधार-स्तंभांवरच पवित्र वृत्तपत्र-मंदिर उभें राहूं शकतें. पण आपले हे आधारस्तंभ पोकळ असतां कामा नयेत. वृत्तपत्रव्यवसायाचें प्रेम म्हणजे नुसती हौस नव्हे. ती अंतरींची ओढ असायला हवी. प्रतिभेच्या नांवाखालीं असंस्कृत आणि असंयमित अशी बुद्धीची आतषबाजी वृत्तपत्रांतून वारंवार दृष्टीला पडते. पण चटकदारपणा व चटोरपणा

यांत जमीनअस्मानाचें अंतर असूं शकतें आणि बुद्धीच्या लखलखाटाच्या मागें ज्ञानाची ज्योति अथवा हृदयाचा जिव्हाळा असतोच असें नाहीं. राज्य-पद्धती काय किंवा कलाकृती काय, लोकांच्या लायकीप्रमाणेंच त्या निर्माण होत असतात हें पूर्ण सत्य नाहीं. तें एक अर्धसत्य आहे. बुद्धिवंतांना बहुजन-समाजाची लायकी वाढवितां येते, त्यांची अभिरुचि सुधारता येते, आपल्या मागून त्यांना उच्च ध्येयपूर्ण वातावरणांत नेतां येतें. प्रतिभेचें लेणें ज्यांना लाभलें आहे अशा पत्रकारांनीं क्षुद्र किंवा क्षणिक लोकरंजनाच्या खालच्या पातळीवर येण्यापेक्षां आपल्या अभिजात वाङ्मयगुणांनीं लोकांना उच्च वैचारिक पातळीवर न्यायला नको काय ?

प्रतिभेप्रमाणें पांडित्याचाहि आपल्याकडे अनेकदां दुरुपयोग झालेला आढळतो. हिरकणी कितीहि मौल्यवान् असली तरी अलंकार म्हणूनच तिचा उपयोग केला पाहिजे ! अन्न म्हणून ती कोणी गिळूं लागला तर त्याच्या प्राणावर बेतल्याशिवाय रहाणार नाहीं. पांडित्याचेंहि असेंच आहे. केवळ त्याच्या प्रदर्शनानें कांहीं वृत्तपत्रांची उपयुक्तता वाढत नाहीं. सामान्य वाच-काच्या गळीं उतरविण्याइतकें तें सोपें करण्याची कलाही पत्रकारांनीं साध्य केली पाहिजे. पुस्तकी पांडित्य हा वृत्तपत्रांतला पांढरा हत्ती आहे, हें त्यांनीं कधींच विसरूं नये. आपल्या पायाखालीं काय जळत आहे, आपल्या भोंव-तालीं कसली आग धुमसत आहे, आपल्या अंगावर येऊन पडणाऱ्या ठिणग्या कुठल्या वणव्याच्या आहेत याचा शोध करायचें सोडून आमचे अनेक पत्र-पंडित रशियांत ठिकठिकाणीं लागलेल्या आगी (त्यांतल्या अनेक काल्पनिकच असतात) विझविण्याकरतां वेळीं अवेळीं आपल्या अक्कलेचे बंब घेऊन धांवत असतात. प्रत्यक्ष कार्य करतांना येणारी अनुभूति हाच पत्रपांडित्याचा निकष आहे याचा जणुं कांहीं विसरच पडतो त्यांना !

प्रज्ञा हा प्रतिभेप्रमाणें निसर्गदत्त किंवा पांडित्याप्रमाणें अभ्याससाध्य असा विशेष नाहीं. तो जीवनाच्या विशाल जाणीवेंतून आणि व्यक्तित्वाच्या सर्व-स्पर्शी विकासांतून निर्माण होतो. पण त्याच्या अभावीं पत्रकाराचे अनेक अमोल गुण वाया जाण्याचा संभव असतो. ज्याचें भूतकालाविषयींचें प्रेम आंधळें नाहीं, ज्याला वर्तमानकाळांतला काळोख भेडसावून सोडीत नाहीं, उलट या काळोखांतच भविष्याचीं उज्ज्वल स्वप्नें पाहण्याची ज्याची शक्ति नित्य विकसित होत असते, तोच प्रज्ञावंत पत्रकार होऊं शकतो.

सध्या जागतिक राजकारणाला विविध हिंस्रपशूंनीं गजबजलेल्या अरण्याचें स्वरूप प्राप्त झालें आहे. आपल्याला गुलामगिरींत डांबून ठेवणारांच्या दृष्टीनें आपणा सर्वांची आमरण लढणारा सैनिक एवढी एकच एक जात होऊं शकते हें आपण जाणायला हवें. पराभूतांच्या पायांत अवजड शृंखला ठोकून त्या पुष्पमाळांनीं शृंगारणाऱ्या धूर्तांशीं आमरण युद्ध करणें हा एकच दुर्दैवानें दास्यांत पडलेल्यांचा धर्म होऊं शकतो. पण आपल्या या अभागी मायभूमींत स्वातंत्र्ययुद्धांतहि धार्मिक पक्ष आणि जातीय उपपक्ष मोठ्या ऐटीनें डेरादांडी देऊन बसले आहेत. आपली कितीतरी शक्ति निरर्थक वादविवादांत, शाब्दिक कलहांत आणि भेदभाव वाढविणाऱ्या कारवाया करण्यांत खर्ची पडत आहे. सामान्य मनुष्याचें कर्तृत्व अगतिक करून सोडणाऱ्या या चक्रव्यूहांतून त्याला प्रज्ञावंत पत्रकारच बाहेर काढूं शकतील. लंडावात निष्णात असलेले लबाड मुत्सद्दी कांहीं म्हणोत, स्वार्थलंपट कोट्यधीशाचे छुपे संकल्प कोणतेहि असोत, शूर तरवारबहाद्दरांना भावी विजयांचीं कसलींहि स्वप्नें पडत असोत, त्यांच्या हातून जगाची घडी यापुढें नीट बसण्याची आशा उरलेली नाहीं. तें काम आता जगांतल्या बहुसंख्य जनतेचें आहे, प्रत्येक राष्ट्रांतल्या प्रत्येक मानवताप्रेमी व्यक्तीचें आहे, जागृत होऊं घातलेल्या जगांतल्या सर्व माणसांच्या अंतःकरणांतल्या आत्मशक्तीचें आहे. त्या आत्मशक्तीला प्रामाणिकपणानें आवाहन देणें, ती संपूर्णपणे जागृत करून विशाल दृष्टीनें तिची संघटना करणें, तिच्या हातांत भावनेचें शस्त्र देणें आवश्यक असलें तरी बुद्धिवादच या भावनेचें सदैव सारथ्य करील अशी दक्षता घेणें, सत्याचा मक्ता कांहीं एकाच पक्षाला किंवा तत्त्वज्ञानाला मिळालेला नसतो हें जाणून त्याचे सर्वत्र विखुरलेले सुवर्णकण एकत्रित करणें आणि या विचारसंपदेच्या साहाय्यानें आजपर्यंत दलित, उपेक्षित आणि दुर्बल राहिलेल्या सामान्य मनुष्याचें कर्तृत्व फुलविणें, एक ना दोन अशा हजारों गोष्टी प्रज्ञानिष्ठ पत्रकाराच्या कुशल मार्गदर्शनाची आज आतुरतेनें वाट पहात आहेत.

मानवधर्माच्या अंतिम ध्येयावरली दृष्टि ढळूं न देतां पायरीपायरीनें तें ध्येय कसें साध्य होईल हें पाहणें, नित्य आणि नैमित्तिक यांचा चातुर्यानें मेळ घालणें, परतंत्र देशांत राजकीय स्वातंत्र्य हेंच जनतेला आपलें साध्य वाटणें

स्वाभाविक असलें तरी उद्यांची राष्ट्रीय क्रांति ही परवांच्या समतेच्या भूमिकेवरून होणाऱ्या सामाजिक क्रांतीचें एकमेव प्रभावी साधन आहे याचा कुणालाहि विसर पडूं न देणें, हीं कामें अशा श्रेष्ठ पत्रकारांचींच आहेत. असे पत्रकार प्रतिभासंपन्न कवीप्रमाणें जन्मावेच लागतात. ते विद्यापीठांतून किंवा वृत्तपत्रकचेऱ्यांतून घडवितां येत नाहींत हें थोडें फार खरें असलें, तरी असे पत्रकार आपल्यामध्यें, आदर्श म्हणून कां होईना, पूज्य मानिले गेले पाहिजेत.

प्रेम, प्रतिभा, पांडित्य आणि प्रज्ञा हें जनमनावर अधिराज्य गाजविणाऱ्या पत्रकाराचें चतुरंग दल आहे. लोकसेवा हेंच या चतुरंग दलानें युक्त असलेल्या पत्रकाराचें प्रमुख कर्तव्य असतें. पण या कर्तव्याची पुरेपूर जाणीव व्हायला, ती जाणीव असूनहि हातून तें तन्मयतेनें पार पाडायला आणि तें पार पाडताना मार्गांत येणाऱ्या विविध मोहांवर विजय मिळवायला पत्रकाराच्या अंगीं पहिल्या प्रतीचा निःस्पृहपणा हवा !

आपण ज्या शतकांत वावरत आहोंत त्यानें मानवतेला अनेक वर दिले असले, तरी त्या वरांचा तिला उपयोग होऊं नये म्हणूनच कीं काय त्यानें तिला एक अघोर शापहि देऊन ठेवला आहे. तो शाप म्हणजे आजच्या समाजांत आत्म्याच्या सुलभ विक्रयाची गुपचुपपणें हां हां म्हणता होणारी व्यवस्था. यंत्रयुगानें निर्माण केलेल्या अर्थनिष्ठ जीवनानें जगाच्या बाजारपेठा जशा सर्वांना मोकळ्या केल्या, त्याचप्रमाणें मानवी जीवनांतल्या प्रिय आणि पूज्य कल्पनाभावनांचाहि बाजार त्यानें निर्माण केला. सर्व सामान्य मनुष्याच्या उदात्त भावना, त्याचीं उज्ज्वल ध्येयें, त्याची बुद्धि, त्याचा आत्मा, त्याची निष्ठा, त्याचें शील, त्याची स्वातंत्र्यप्रियता, सर्व कांहीं या बाजारात आजकाल विकत घतलें जातें. हा माल विकत घेणारीं गिऱ्हाइकें मुख्यतः दोन वर्गांतलीं असतात. पहिला सत्ताधाऱ्यांचा आणि दुसरा संपत्तिवाल्यांचा ! अडाण्यापेक्षा सुशिक्षित, शिकलेल्या कारकुनापेक्षां कुशाग्र बुद्धीचा पंडित, बुद्धिवान पंडितापेक्षां चतुर वक्ता आणि कुशल लेखक अशा या गिऱ्हाइकांच्या आवडीच्या अनेक चढत्या पायऱ्या असतात. पत्रकाराइतकी प्रभावी सार्वजनिक शक्ति आजच्या जगांत दुसरी कुठलीही नसल्यामुळें साहजिकच या मालावर या वज्या थैंडांची अधिक उडी पडते. त्याच्या दारिद्र्याचा अवास्तव

फायदा घ्यायला हे शिष्ट लोक कधींच कचरत नाहींत. आपलीं सोंगेंढोंगें चव्हाट्यावर आणण्याचें किंवा आपल्या अमानुष अन्यायांना सतत वाचा फोडण्याचें सामर्थ्य फक्त पत्रकारांच्याच अंगीं मोठ्या प्रमाणांत असतें याची पुरेपूर कल्पना असल्यामुळें त्याला गुलाम करण्याकरितां ते नेहमीं त्याच्या वाटेंत सोन्याचे मोहक सांपळे ठेवतात, त्याच्या भोंवतीं संकटाचीं जाळीं कुशलतेनें पसरलीं जातील अशी काळजी घेतात. त्यांच्या जाळ्यांत जो अडकला किंवा सोनेरी सापळ्यांत जो सांपडला तो आपल्या आत्म्याला मुकला असें खुशाल समजावें. आत्मविक्रय हा प्रथम प्रथम फुटकळ व्यापार वाटत असला तरी त्याचें खरेंखुरें स्वरूप घाऊकच असतें. पत्रकाराचा आत्मविक्रय हा तर जगातला सर्वांत मोठा बौद्धिक व्यभिचार आहे. एखाद्या प्रचंड शहराला पाणी पुरविणाऱ्या तलावांत थेंबाथेंबानें पण क्षणाक्षणाला विष घालण्याइतका तो राक्षसी गुन्हा आहे. आपलें आसन टिकवूं पहाणारे अधिकारी आणि आपलें सिंहासन संभाळूं पहाणारे संस्थानिक, कोटीचे दहा कोटी करण्याकरता धडपडणारे धनिक आणि त्यांच्या नागड्याउघड्या स्वार्थावर आपल्या पांडित्याचें पांघरूण घालणारे पढिक प्रचारक, आपल्या पोकळ प्रतिष्ठेचे, आचरट अहंकाराचे किंवा लुळ्यापांगळ्या तत्त्वज्ञानाचे डोलारे लोकांनीं पूज्य मानावे या कल्पनेनें झपाटलेले लब्धप्रतिष्ठित, इत्यादिकांना यापुढच्या काळांत पत्रकाराचे मोठेंपण पूर्वीपेक्षाहि अधिक तीव्रतेने पटेल. त्यांना विकत घेण्याचे प्रयत्न ते मोठ्या कसोशीनें आणि कौशल्यानें करतील. अशा प्रकारचा राष्ट्रीय अधःपात टळावा, वृत्तपत्रें हीं स्वभावतः स्वतंत्र वृत्तीचीं शिकारी कुत्रीं असतात, तीं कुणाचींहि पाळीव कुत्रीं होऊन चार तुकड्यावर राजी राहायला कधींच तयार होणार नाहींत हें जगाला कळावें, पत्रकाराच्या सामर्थ्यशाली लेखणीनें कुणाचेंहि दास्य—मग तें बंदुकांचें असो वा संदुकांचें असो, सत्तेचें असो अथवा संपत्तीचें असो, सामाजिक रूढींचें असो किंवा धार्मिक तत्त्वज्ञानाचें असो—पतकरूं नये म्हणून इशाऱ्याचा हा तांबडा कंदील दाखविण्याचें धाडस मी करीत आहें.

आतांपर्यंत मीं पत्रकारांच्या कठोर कर्तव्याचाच विचार केला. पण जो आपलें कर्तव्य तत्परतेनें आणि प्रामाणिकपणानें पार पाडतो, त्याच्या हक्कांची काळजी सध्यांच्या समाजांत घेतली जातेच असें नाहीं. जो सर्वांत मोठा

करभार सोसतो त्या कर्योला आपल्या देशाच्या कारभारांत कितीसा भाग दिला जातो ? राष्ट्राच्या पुढच्या पिढीची उंची ज्याच्या कर्तृत्वावर अवलंबून आहे तो प्राथमिक शिक्षक पिढ्यान्‌पिढ्या अर्धपोटीं रहात आला आहे, याची दखल आजपर्यंत आपण कितीशी घेतली आहे ! समाजसेवेकरतां संसारावर तुळशीपत्र ठेवणाऱ्या किंवा देशासाठीं धगधगत्या अग्निकुंडांत उडी घेणाऱ्या त्यागी नरपुंगवांच्या बायका-पोरांना मध्याह्नकाळीं चार घांस मिळतात कीं नाहीं याची काळजी आपल्यांतले कितीसे लोक करतात ? धर्म आणि अर्थ यांचें सहकार्य नसणें हा सध्यांच्या समाजरचनेंतला सर्वांत मोठा दोष आहे. मूलगामी समतेचा पुरस्कार करणारी आणि सामान्य मनुष्याला ध्येयवादी बनविणारी सामाजिक क्रांतिच तो दोष नाहींसा करील. त्या क्रांतीच्या क्षणापर्यंत शिक्षक, लेखक, पत्रकार आणि समाजसेवक यांनीं आपण बौद्धिक काम करणारे मजूर आहोंत, किसानकामगारांचे मध्यम वर्गांतले भाऊबंद आहोंत, असें गृहीत धरूनच आपलें कर्तव्य करीत आणि आर्थिक हक्काकरतां झगडत राहिलें पाहिजे. मराठी पत्रकार--परिषदेनें हा प्रश्न हातीं घेतलाच आहे. तो सोडविण्याच्या कामीं वृत्तपत्रांशीं संबंध असणारी सर्व मंडळी आपली पराकाष्ठा करतील अशी मला आशा आहे.

मित्रहो, पत्रकारांची अखिल भारतीय संघटना, हरतऱ्हेच्या फसव्या जाहिरातींवर बहिष्कार टाकण्याची कांहींतरी व्यवहार्य योजना, मराठी वृत्तपत्रें हेंच मराठी बहुजनसमाजाचें खरेंखुरें विद्यापीठ असल्यामुळें त्याला पोषक होणाऱ्या महाराष्ट्रविद्यापीठाची स्थापना, महाराष्ट्राच्या एकीकरणाची कल्पना, इत्यादि विषय निरनिराळ्या दृष्टींनीं अत्यंत महत्त्वाचे असले तरी सद्यःस्थितींत त्यांना शाब्दिक पाठिंबा देण्यापलीकडे आपलें हें छोटेसें प्रादेशिक संमेलन दुसरें काय करूं शकणार आहे ? मात्र वृत्तपत्रव्यवसायातल्या अनेक शाखांचें पद्धतशीर शिक्षण मिळाल्याशिवाय त्यांच्यांत सुधारणा होणें दुरापास्त असल्यामुळें पत्रपांडित्याच्या अभ्यासक्रमाचा प्रश्न आपल्या दृष्टीनें अधिक निकडीचा आहे. मुंबई विद्यापीठाच्या मागें लकडा लावूनहि हें काम लवकर होण्यासारखें नसेल तर ज्या टिळक विद्यापीठाचा रौप्यमहोत्सव लवकरच साजरा होणार आहे त्या विद्यापीठामार्फत पत्रपांडित्याचे पदवीपरीक्षेपर्यंतचे सर्व वर्ग चालविले जातील अशी खटपट

अखिल महाराष्ट्रानें करून पाहिली पाहिजे. टिळकविद्यापीठानें वृत्तपत्र-शिक्षणाचा पुरस्कार करणें हें सर्व दृष्टीनें समुचित आहे हें काय मी सांगायला हवें ? लोकमान्य टिळक हे महाराष्ट्राचे आदर्श पत्रकार होते आणि वृत्तपत्र-शिक्षण हें सामान्य शिक्षणाहून स्वभावतःच अधिक राष्ट्रीय असें शिक्षण आहे.

दक्षिणी संस्थानांतल्या पत्रकारांचें हें संमेलन असूनहि या संस्थानांतल्या अनेकविध गुतागुंतीच्या प्रश्नांचा किंवा तिथल्या लहानमोठ्या घडामोडींचा उल्लेख मी मुळींच केला नाहीं याचें कदाचित् आपल्याला आश्चर्य वाटेल. मी पंडित असतों तर सामायिक हायकोर्टापासून दक्षिणी–संस्थान–लोकपरिषदेपर्यंतच्या अनेक प्रचलित प्रश्नांचा परामर्श मी अवश्य घेतला असता. पण पांडित्याचा माझ्यापाशीं पूर्ण अभाव आहे. शिवाय निरनिराळ्या प्रजापरिषदा राजकारणाचे स्थानिक प्रश्न यथाशक्ति आणि यथामति सोडवीत आहेत. अनेक कर्तबगार माणसें आपापल्या आवडीच्या क्षेत्रांत निष्ठेनें सामाजिक कार्य करीत आहेत. या सर्व व्यक्तींच्या विषयीं माझ्या मनांत अत्यंत आदर वसत आहे. त्यांची धडपड स्थानिक किंवा नैमित्तिक असली तरी तिच्या मागें किती तळमळ आणि केवढा त्याग आहे याची मला पूर्ण कल्पना आहे. आपण पत्रकारांनीं पक्षाभिनिवेश न धरता त्या सर्वांना शक्य तें साहाय्य केलें पाहिजे.

मात्र एकीकडे असें साहाय्य करीत असतांनाहि आपला दृष्टिकोन विशाल आणि तेजस्वी व्हावा म्हणून आपण निष्ठेनें विविध शास्त्रांची आणि समाज-जीवनाची उपासना केली पाहिजे. वृत्तपत्रें कितीहि लहान असलीं तरी तीं गरुडाचीं पिलें असतात. जवळच्या सर्पांच्या संहाराइतकेंच दूर स्वर्गांत असलेला अमृतकुंभ हस्तगत करणें हेंहि गरुडाचें उद्दिष्ट असलें पाहिजे. आपला समाज, आपलें राष्ट्र किंबहुना अखिल मानवजात आज कोणत्या स्थितींत आहे आणि ही दारुण दुर्दशा नाहींशी करण्याकरितां आपण कोणत्या मार्गानें गेलें पाहिजे, याचा संतत विचार करणें हें आपलें कर्तव्य आहे. स्वप्नाळु न होतांहि जो भविष्याचीं उज्ज्वल स्वप्नें पाहूं शकतो त्यालाच क्रांतीचा सच्चा सैनिक म्हणवून घेण्याचें भाग्य लाभतें. हें भाग्य आपणा पत्रकारांच्या वांट्याला इतरांपेक्षां अधिक प्रमाणांत येण्याची शक्यता नेह-मींच आहे. ' मुकुट रंकासि दे, करटि भूपाप्रती ' असें आळवीत तांब्यांनीं

ज्या रुद्राला आवाहन केलें त्याच्या अवताराला अधिक योग्य असें कुठलें जग आजकाल असेल तर तें वृत्तपत्रांचेंच आहे. अंध रूढी, जुलूम आणि गुलामगिरी–मग तीं राजकीय असोत, सामाजिक असोत, धार्मिक असोत वा आर्थिक असोत–यांचीं पाळेंमुळें खणून काढणें हें पत्रकारांच्या कुळाचें ब्रीद आहे. सहा वर्षांची हद्दपारीची शिक्षा ठोठावणाऱ्या आंधळ्या पण उद्दाम ब्रिटिश न्यायदेवतेला 'तुझ्यापेक्षां श्रेष्ठ अशी शक्ति जगांत आहे' असें बजावून सांगणाऱ्या लोकमान्यांचा वारसा तुमच्याकडे आलेला आहे. तुमच्या लेखणींत सत्याचें आणि न्यायाचें सर्व सामर्थ्य एकवटूं दे. तिच्या अंगीं आपोआप वज्राची शक्ति निर्माण होईल. त्या वज्राच्या प्रहारांनीं भारत-मातेच्या पायांतून तुटून पडणारी एक एक शृंखला माझ्या डोळ्यांपुढें उभी रहात आहे. ही राक्षसी हुकूमशाही, जिची तृष्णा कधींच शमत नाहीं अशी ही अघोर साम्राज्यशाही, माणसाला माणसाच्या रक्ताची चटक लावणारी ही आर्थिक विषमता, माणसाला पशूचें जीवन कंठायला लावणारें हें अज्ञान, या जगात माणसाला फक्त मरण्याचा हक्क आहे असें वाटायला लावणारें हें अगानुप दारिद्र्य—

इतक्याच्या दास्यातून मुक्त होऊं इच्छिणारें हें जुनें गांजलेलें जग–त्या जगांतली तुमची ही दुर्दैवी मातृभूमि तुम्हांला केशवसुतांच्या वाणीनें विनंति करीत आहे—

पूर्वीपासुनि अजुनि सुरासुर
तुंबळ संग्रामाला करिती
संप्रति दानव फार माजती
देवांवर झेंडा मिरविती
देवांच्या मदतीस चला तर !

———

# न झालेलें भाषण

महाराष्ट्र-मंडळ.

उज्जयिनी

१९३९

मित्रहो,

आपल्यासारख्या दूरस्थ सुहृदांच्या सहवासांत आणि प्रिय अशा साहित्यविषयक चर्चेत दोन दिवस घालविण्याचा योग आज मला आणून दिल्याबद्दल येथील महाराष्ट्र मंडळाचा मी अत्यंत आभारी आहें. डोंगरचे आवळे व समुद्राकांठचें मीठ यांची ही भेट आहे असें म्हटलें तरी हरकत नाहीं. शिरोड्यासारख्या कोंकणांतल्या एका आडबाजूच्या खेड्यांत राहणारा माझ्यासारखा लेखक विंध्याचल ओलांडून मराठी भाषेच्या एका सुखसोहळ्यांत भाग घेण्याकरितां आज उज्जयिनींत उपस्थित झाला आहे, या एका दृष्टीनेंच मी हें म्हणत नाहीं. अशा उत्सवांत जी साहित्य-चर्चा होत असते, तिच्यांतला खरा रस आपल्यासारख्या वाङ्मयभक्तांच्या कुशाग्र पण सहृदय अशा रसिकतेंतूनच मुख्यतः निर्माण होत असतो. तथापि आवळ्याचा आस्वाद घेतांना थोड्याशा मिठानें जशी त्याची रुचि वाढते, त्याप्रमाणें लेखकाच्या सान्निध्यानें रसिकांच्या विचारविकासालाहि थोडें फार साहाय्य होतें. त्या हेतूनेंच आपण मला हें अध्यक्षस्थान दिलें आहे असें मी मानतों.

लहानपणीं कुठल्याहि सभेला गेलें कीं तिचें अध्यक्षपद अलंकृत करणाऱ्या मनुष्याचा मला फार हेवा वाटे. बाकीचे लोक गर्दींत कसेबसे एकमेकांना चेंगरीत बसले असतांना त्याला मिळणारी ती उच्च प्रशस्त खुर्ची, अध्यक्षमहाराज नुसते उभे राहिले तरी होणारा टाळयाचा कडकडाट, भाषण संपल्याबरोबर त्यांच्या गळ्यांत पडणारा तो सुंदर फुलांचा लांबलचक हार—बाळपणांतल्या अनेक महत्त्वाकांक्षांपैकीं एकदां तरी सभेचा अध्यक्ष होणें ही माझी एक प्रमुख आकांक्षा होती !

पण लहानपणचें तें गोड स्वप्न प्रत्यक्षांत उतरूं लागल्यापासून माझी अध्यक्ष होण्याची हौस पार मावळून गेली आहे. राजाच्या मुकुटाप्रमाणें अध्यक्षाची खुर्चीही कांटेरी असते हा अनुभव मी हल्लीं वारंवार घेत आहें. श्रोत्यांच्या स्वतःविषयींच्या विविध अपेक्षा पूर्ण करणें आपणांला शक्य नाहीं या विचारानें क्षणोक्षणीं हा प्राणी मनांतल्या मनांत किती अस्वस्थ होत असतो हें—छे ! स्त्री आणि दलित यांच्यासारखेंच अध्यक्षाचेंही एक तीव्र दुःख असतें. सभापति झाल्याशिवाय तें मूक दुःख कुणाला कधींच कळायचें नाहीं.

स्वतःच्या अपूर्णतेची अशी जाणीव असूनहि आपल्या आजच्या समारंभाचें निमंत्रण मीं स्वीकारलें तें मुख्यतः दोन कारणांकरितां. पहिलें—या इतिहासप्रसिद्ध अवंतिका नगरीच्या दर्शनाविषयींची माझी फार दिवसाची अतृप्त उत्सुकता. लहानपणीं आजोबांच्या प्रातःस्मरणानें मी जागा होत असें. त्यावेळीं ते 'अयोध्या मथुरा माया' हा श्लोक म्हणूं लागले कीं माझ्या डोळ्यांपुढें त्या प्रत्येक पुण्यक्षेत्रांचें अद्भुतरम्य चित्र उभें राही, इतिहास-पुराणांत वाचलेल्या त्या स्थानाविषयींच्या रम्य गोष्टी आठवूं लागत आणि या प्राचीन पुनीत स्थलांचें दर्शन आपल्याला कधीं होईल अशी हुरहुर मनाला लागे. कॉलेजमध्यें गेल्यावर कालिदासाशीं परिचय होऊन अवंतिकेविषयीं लहानपणापासून मनाला वाटणारी उत्सुकता शतपटींनीं वाढली. ती तृप्त होण्याची संधि आपणांमुळें आज मला लाभत आहे.

अध्यक्षपद स्वीकारण्याचें दुसरें कारण आपल्यासारख्या साहित्यप्रेमी रसिकांच्या विचारविनिमयाचा लाभ हें आहे. हरून अल् रशीद वेषांतर करून रात्रीं अपरात्रीं आपल्या नगरींत फिरत असे अशी जी आख्यायिका आहे,

तिच्यांत इतिहासाच्या दृष्टीनें नसला तरी मानवी स्वभावाच्या दृष्टीनें फार मोठा सत्यांश आहे. आपला राज्यकारभार प्रजेला सुखावह व्हावा अशी प्रामाणिक इच्छा असणाऱ्या राजानें तिचीं खरीखुरीं गाऱ्हाणीं ऐकण्याकरितां जसें राजवाड्याबाहेर पडलें पाहिजे, त्याप्रमाणें आपलें लेखन समाजाच्या उच्च आनंदांत भर टाकणारें आणि त्याच्या सर्वांगीण प्रगतीला हातभार लावणारें व्हावें, असें ज्या लेखकाला मनःपूर्वक वाटतें, त्यानें निरनिराळ्या ठिकाणीं राहाणारे आणि विविध व्यवसाय करणारे रसिक आपल्या वाङ्मयाविषयीं काय म्हणतात हें ऐकायला आपल्या चिमुकल्या कल्पनारम्य घरकुलाबाहेर आलें पाहिजे. या आकर्षणानेंहि मला येथें ओढून आणलें आहे. मात्र या बाबतींत लेखक राजापेक्षां अधिक भाग्यवान असतो हें कबूल केलेंच पाहिजे. स्वतःविषयींची वाचकाचीं मतें ऐकण्याकरिता त्याला वेषांतर करावें लागत नाहीं, किंवा रात्रींअपरात्रीं काळोखांत भटकावेंहि लागत नाहीं. तो उजळ माथ्यानें दिवसाढवळ्या अध्यक्षाच्या खुर्चीवर येऊन ऐटीनें ती अलंकृत करूं शकतो.

आज येथें जे साहित्यभक्त जमले आहेत, त्यांच्या कर्तृत्वाची अनेक वाङ्मयीन कार्यक्षेत्रें आतुरतेनें वाट पहात आहेत. महाराष्ट्राच्या मध्यभागापासून आपण दूर असाल; पण मातृभाषेच्या प्रेमाला आपण मुळींच दुरावला नाहींत असें मी निःशंकपणें म्हणूं शकतों. उज्जयिनीची वेधशाळेबद्दल असलेली कीर्ति वाङ्मयाच्या बाबतींतहि आपणाला सार्थ करतां येईल. हिंदी आणि मराठी यांच्या सीमा येथें परस्परांना बिलगल्या आहेत, किंबहुना त्या दोघी एकाच घराण्यांत दिलेल्या बहिणीबहिणीप्रमाणें येथें नांदत आहेत. या परिस्थितीचा हौशी मराठी साहित्यसेवकांनीं अवश्य उपयोग करून घेतला पाहिजे. यापुढें हिंदी,मराठी, बंगाली, गुजराथी, तमिळ किंवा कानडी वाङ्मय ती ती भाषा बोलणाऱ्या प्रांतांत कोंडून रहातां कामा नये. त्याचा सर्व भारतवर्षांत पद्धतशीर प्रसार होणें राष्ट्रीय दृष्ट्या आवश्यक आहे. आजच्या प्रत्येक प्रांतिक वाङ्मयाची स्थिति तिजोरींत ठेवलेल्या पारिजातकाच्या फुलांसारखी किंवा निर्नाद (Sound proof) खोलींत गायिल्या जाणाऱ्या गंधर्वगीतासारखी आहे. साक्षर समाजाची वाचनाची भूक झपाट्यानें वाढत असली तरी मातृभाषेंत प्रसिद्ध होणाऱ्या तिसऱ्या व चवथ्या दर्जाच्या वाङ्मयावरच

त्यांला ती आज कशीबशी भागवावी लागत आहे. अशा वेळीं प्रांतिक भाषांनीं जर आपआपल्या अभिजात आणि सौंदर्ययुक्त वाङ्मयाची देवाण-घेवाण केली तर सामान्य वाचकांच्या अभिरुचीला सहजासहजीं श्रेयस्कर वळण लागेल. भिन्न भिन्न प्रांतांतील लोकांना दुसऱ्या प्रांतांतील चालीरीती, विचारप्रवाह, सामाजिक प्रश्न, इत्यादिकांचा वाङ्मयद्वारानें होणारा परिचय ज्या अखंड भारताचीं आणि समताप्रधान समाजरचनेचीं आपणांला स्वप्नें पडूं लागलीं आहेत त्यांच्या प्रत्यक्ष अवताराला परिपोषक झाल्यावाचून रहाणार नाहीं. उच्च दर्जाचें हिंदी साहित्य मराठींत आणणें आणि श्रेष्ठ मराठी साहित्याला हिंदी वेष चढविणें हीं कामें येथील साहित्यसेवकानीं अगत्य हातीं घ्यावीत अशी मी त्याना विनंति करतों. सध्यांच्या जगांत पिकविणाराइतकेंच प्रसार करणाराचेंहि महत्त्व आहे. येथील एक साहित्यिक प्रो. अ. म. जोशी यांनीं जैनेंद्र कुमारांच्या एका छोटया कादंबरीचा अलीकडेच मराठींत केलेला सरस अनुवाद आपण सर्वांनीं वाचला असेलच. त्यांच्याप्रमाणें इतरानीं हा मार्ग चोखाळला तर आजच्या मराठी वाङ्मयांत राष्ट्रीय दृष्टया महत्त्वाची व साहित्याच्या दृष्टीनें मोलाची भर घालण्याचें श्रेय त्यांना मिळेल.

अशा प्रकारचें अनुवादित वाङ्मय हें लग्नांतल्या आहेरासारखें असतें, असें म्हणतां येईल. आहेरादाखल आलेल्या वस्तु सुंदर आणि मौल्यवान असतात यांत शंका नाहीं. पण त्या वस्तु म्हणजे कांहीं आपली घरातली सर्व संपत्ति नव्हे. घराचें वैभव त्याच्या सजलेल्या विविध दालनांत, देवघरापासून अभ्यासिकेपर्यंत ( Study-room ) सर्वत्र दिसून येणाऱ्या अनुरूप सुंदर साहित्यांत, घरात वावरणाऱ्या स्त्रियांच्या नि मुलांच्या वस्त्रालंकारांत, आणि त्यापेक्षांहि घरांत राहणाऱ्या माणसांच्या अंगच्या सौजन्यांत आणि सामर्थ्यांत दिसून येतें. त्या दृष्टीनें आजच्या मराठी शारदेच्या मंदिराकडे पाहिलें तर आपल्याला काय दिसतें ? कथा-कादंबऱ्यांच्या दालनाशिवाय इतर सर्व दालनें आपणांला थोडीं फार ओकीओकीं वाटत नाहींत काय ? आणि कथा-कादंबऱ्यांची विपुलता डोळयांत भरण्याजोगी असली तरी त्यांतहि संख्या आणि गुण यांचें प्रमाण सम आहे असें म्हणण्याचा कांहीं मनाला धीर होत नाहीं. वाचक वाढले आहेत; पण वाचकांची अभिरुचि

मात्र अभिजात झालेली नाहीं. कुठल्याहि काळांतल्या वाङ्मयनिर्मितीचें स्वरूप कांहीं अंशीं वाचकांवर अवलंबून असल्यामुळें अजूनहि सूक्ष्म कला-गुणांनीं युक्त असें ललित अथवा विचारप्रवर्तक वाङ्मय मराठींत विपुल प्रमाणांत उत्पन्न होऊं शकत नाहीं.

याचा अर्थ आजच्या मराठींत वरच्या प्रतीचे लेखक नाहींत असा मुळींच नाहीं. फडक्यांची 'दौलत' अथवा 'प्रवासी' कादंबरी हिंदुस्थानांतल्या कुठ-ल्याहि भाषेंत किंबहुना इंग्रजींत अनुवादित झाली तरी ती तिथल्या रसिकांना आवडल्याशिवाय राहणार नाहीं. 'इंदु काळे आणि सरला भोळे,' 'सुकलेलें फूल,' 'धांवता धोटा,' 'भंगलेलें देऊळ', 'हिंदोळयावर' इत्यादि कादंबऱ्या कुठल्याहि साहित्यांत वरच्या दर्जाच्याच ठरतील. तांबे, यशवंत, बोरकर यांच्या निवडक कविता, कृष्णाबाई, य. गो. जोशी, लक्ष्मणराव सरदेसाई प्रभृतींच्या कांहीं कथा, काणेकर व फडके यांचे दहावीस लघुनिबंध, वरेरकर आणि अत्रे यांचीं तीनचार नाटकें इत्यादि आजकालचें साहित्य अभिजात वाङ्मयाच्या कठोर कसोटीलासुद्धां उतरेल याबद्दल मला शंका वाटत नाहीं. पण हें साहित्य म्हणजे भर उन्हांतून रस्त्यानें प्रवास करणाऱ्या पांथस्थाला मधून मधून सावली देणाऱ्या विरळ वृक्षराजीसारखें आहे. आपल्या मार्गाच्या दोन्ही बाजूंना असले वृक्ष अखंड ओळीनें लावलेले असावेत आणि त्यांच्या सुंदर संमिश्र छायेंत तीव्र उन्हाचें शीतल चांदण्यात रूपांतर व्हावे असें आपल्यापैकीं कुणा साहित्यपथिकाला वाटत नसेल ?

दरवर्षी मराठींत कमींत कमी चारपांचशें छोटीं मोठीं पुस्तकें प्रसिद्ध होतात. पण या पुस्तकांत आपल्या कलागुणांनीं रम्य वाटणारीं अथवा आपल्या विचारविलासानें वाचकांच्या अनुभूतीला विशालता आणणारीं पुस्तकें कितीशीं असतात ? प्रत्येक वर्षी प्रसिद्ध होणारीं सर्व मराठी पुस्तकें चाळणाराला आपण एखाद्या गायनशाळेंत जाऊन पांच-पंचवीस गोड गळ्यांच्या मुलामुलींचें गायन ऐकून आलों असा भास होतो. पण चार दोन नामांकित गवयांच्या मैफलींत बसल्यावर मनाला जो आनंद होतो तो मात्र त्याच्या वांट्याला सहसा येत नाहीं.

सर्व सामान्य मराठी वाङ्मयाचा दर्जा अजून उच्च न होण्याचें कारण लेखकाच्या व्यक्तित्वाच्या दारिद्र्याइतकेंच रसग्राहक आणि मार्गदर्शक अशा

टीकेचें दारिद्र्य हेंहि आहे असें मला वाटतें. आजच्या प्रमुख लेखकांपैकीं माडखोलकरांसारख्या अनेक साहित्यिकांनीं पूर्वी श्रेष्ठ दर्जाचें टीकालेखन केलें असलें तरी आज 'न धरीं शस्त्र करीं मी' अशीच त्यांच्यापैकीं बहुतेकांनीं प्रतिज्ञा केलेली दिसते. मागच्या पिढींतल्या केळकर, कोल्हटकर, वामनराव जोशी प्रभृति अव्वल दर्जाच्या साहित्यिकांनीं एकमेकांच्या कलाकृतींवर प्रामाणिक टीका केल्यामुळें वाचकांना जें मार्गदर्शन लाभूं शकलें, तें आजच्या घटकेला मराठी वाङ्मयांत दुर्लभ होऊन बसलें आहे. 'अहं ब्रह्मास्मि,' 'अहो रूप-महोध्वनिः' आणि 'तेरीबी चूप मेरीबी चूप' हींच आजच्या अनेक प्रमुख लेखकांचीं ब्रीदवाक्यें आहेत कीं काय असा मधून मधून भास झाल्या-वांचून रहात नाहीं. 'ज्याच्या हातीं ससा तोच पारधी' ही म्हण आतां फार जुनाट झाली. 'ज्याच्या हातीं वर्तमानपत्र तो साहित्याचा श्रेष्ठ टीका-कार' अशी नवी म्हण रूढ होण्याचा काळ सध्यां आला आहे !

क्वचित् प्रसिद्ध होणारें एखादें पुस्तक सोडून दिलें तर टीकावाङ्मय या सदरांत समाविष्ट होणारा मजकूर सध्या दोन ठिकाणीं प्रसिद्ध होत असतो—वर्तमानपत्रांत आणि मासिकांत. ज्ञातम्या, जाहिराती, उखाळ्या-पाखाळ्या काढणारीं पत्रें आणि गोम्यासोम्यांच्या मुलाखती, यांच्या मानानें पुस्तकपरीक्षण हें सदर कमी चटकदार असतें अशी खात्री असल्यामुळें वर्तमानपत्रांतली परीक्षणांची आणि अभिप्रायाची जागा हवी तेव्हां असल्या दुसऱ्या महत्त्वाच्या मजकुराला देण्यांत येते. प्रसंगीं ती टीकेसाठीं वापर-ण्यांत आली तरी एखादे वेळीं राजवाड्यांतल्या भव्य दिवाणखान्यांत उच्चासनावर बसलेल्या राजाप्रमाणें त्यांत एकाच पुस्तकाचा परामर्ष घेण्यांत येतो आणि एखादे वेळीं धर्मशाळेंत गर्दी करून पडलेल्या माणसांप्रमाणें पांच पंचवीस पुस्तकें त्यांत कोंबलेलीं असतात. नोकरीप्रमाणें अभिप्रायाच्या बाबतींतहि वशिला प्रभावी ठरतो असा अनेक नव्या जुन्या लेखकांचा अलीकडचा अनुभव आहे म्हणे !

इतका खटाटोप करून वर्तमानपत्रांत जो अभिप्राय येतो तो वाचला कीं 'खटाटोपो भयंकरः' या उक्तीची सार्थकता लेखकाला क्षणार्धांत पटते. अभिप्रायाची बरीचशी जागा कादंबरी असल्यास तिच्या कथानकानें, कथासंग्रह असल्यास त्यांतल्या गोष्टींच्या सारांशानें, आणि काव्यसंग्रह

असल्यास कवितांच्या उताऱ्यांनीं बहुधा भरून काढण्यांत येते ! दोनचार वृत्तपत्रांतल्या उलट सुलट अभिप्रायांची मिसळ करून ती आपल्या वाचकांना वाढण्यांतहि कित्येक उपसंपादक उपाहारगृहाच्या चालकांपेक्षा अधिक कुशलता व्यक्त करतात. या पद्धतींत फायदेहि अनेक आहेत. पहिला फायदा म्हणजे निरनिराळ्या अभिप्रायांतलें तिखटमीठ मिसळल्यामुळें हा संमिश्र अभिप्राय कमालीचा खमंग होतो. दुसरा, अभिप्राय देण्याकरितां पुस्तक वाचण्याचा बिलकुल त्रास घ्यावा लागत नाहीं. ही दुसरी गोष्ट वर्तमानपत्री टीकाकाराच्या दृष्टीनें फार महत्त्वाची असते. कारण अनेकदां अभिप्रायाकरितां त्यानें घरीं नेलेल्या पुस्तकाच्या त्यानें तें उघडण्यापूर्वींच त्याचीं मुलें चिंधड्या उडवितात. कित्येकदां मोठेपणाच्या मोहानें त्याची पत्नी घराला मोफत वाचनालयाचें स्वरूप देते. आणि मग या मोफत वाचनालयांतून तिच्या मैत्रिणींनीं नेलेलें पुस्तक घरोघर फिरत शेवटीं जुन्या बाजारांत पदपथावर विश्रांति घेत पडतें ! अशा प्रतिकूल परिस्थितींतहि ह्या पुस्तकावर अभिप्राय देण्याची दक्षता घेणारा उपसंपादक किती बुद्धिवान असला पाहिजे हें सांगण्याची काय आवश्यकता आहे ?

राजकारण अथवा सामाजिक चळवळी यांच्या जोडीनें आपण वाङ्मयाचें सामाजिक महत्त्व मान्य करूं लागलों आहों. अशा वेळीं वाङ्मयीन चर्चेला बुद्धिप्रधान बैठक निर्माण करून देणें किंवा तिच्यात विचारप्रवर्तक वैचित्र्य आणणें वर्तमानपत्रांना फारसें अशक्य नाहीं. पण हें कार्य कसोशीनें पार पाडणारीं वृत्तपत्रें सध्या अतिशय थोडीं आहेत. उणीव जागेची नाहीं, निष्ठेची आहे. दारिद्र्य आहे तें साधकांचें; साधनांचें नव्हे.

वर्तमानपत्रांकडून मासिकांकडे दृष्टि वळवली कीं खडकाळ प्रदेशांतून आपण मैदानात उतरलो असा थोडा वेळ भास होतो. मासिकांतलीं परीक्षणें सामान्यतः थोडीं विस्तृत असतात. टीकाकाराची कुशाग्र रसिकताहि या लिखाणांतून व्यक्त होत असते. पण प्रो. आंबेकर, क्षीरसागर, शेप, शरच्चंद्र, निरंतर असे कांहीं सन्मान्य अपवाद वगळल्यास सध्याचें नियतकालिकांतील टीकालेखन उथळ, मामुली, औपचारिक अथवा एकांगी असतें असेंच म्हणावें लागेल.

उदाहरणार्थ शकुंतला परांजपे या रसिक विदुषीचे समाजस्वास्थ्यात

येणारे अभिप्राय पहावेत. ते वाचून करमणूक होते हें मी आरंभीच आनंदानें कबूल करतों. पण टीकालेखनाचा उद्देश येनकेन प्रकारेण करमणूक करणें हा नसल्यामुळें शकुंतलाबाईंचा वाचक त्यांचें लिखाण वाचून घुचकळ्यात पडतो ! या लेखिकेनें वरेरकरांच्या 'पेटतें पाणी' या कादंबरीवर नुकताच आपला अभिप्राय दिला आहे. मामांनीं या कादंबरींत केलेल्या दारूबंदीच्या पुरस्कार शकुंतलाबाईंना मान्य नाहीं. का म्हणून विचाराल तर त्या उत्तर देतील, ' मी मधून मधून मद्य घेते. पण मला दारूचा कोणताहि दुष्परिणाम कधींच जाणवला नाहीं.' या उत्तरांतला शब्द नि शब्द खरा मानायला मी तयार आहें. प्रश्न एवढाच आहे कीं व्यक्तिशः शकुंतलाबाईंना मद्याचे दुष्परिणाम भोंवले नसले म्हणून दारूमुळें अनर्थ होत नाहींत, हा त्यांनीं काढलेला निष्कर्ष तर्कशुद्ध कसा ठरतो ? असा कांहीं तरी अडवणुकीचा प्रश्न आपल्याला विचारला जाईल या कल्पनेनें त्यांनीं पुढें लिहिलें आहे- 'मध्यम स्थितींतलीं मद्य घेणारीं शेंदोनशें कुटुंबें मीं पाहिलीं आहेत. पण या कादंबरींतल्या बेताल बापाप्रमाणें वागणारा एकहि माणूस मी पाहिला नाहीं !' शकुंतलाबाईंनीं या शेंदोनशें कुटुंबाचीं नांवे आपल्या बाजूचे साक्षीदार म्हणून प्रसिद्ध केलीं तर पुण्याच्या संस्कृतिसंरक्षक मंडळात काय हलकल्लोळ उडेल आणि तेथल्या अग्निहोत्रमंदिरातला अग्नि किती भडकेल हा प्रश्न आपण सोडून देऊं ! पण दारूमुळें ज्या कुटुंबाची वाताहत झाली आहे अशा शेंदोनशें कुटुंबाचीं नावें वरेरकरहि त्यांना सहज सुनावूं शकतील. व्यक्तिनिष्ठ अनुभव ही तत्त्वप्रतिपादनाची वा वाङ्मयांतल्या वास्तवतेची कसोटी होऊं शकत नाहीं, हें अनेक पाश्चात्त्य भाषांतील उत्कृष्ट वाङ्मयाशीं परिचय असूनहि शकुंतलाबाईंच्या लक्षांत येऊं नये, ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे.

टीकाकाराला लागणाऱ्या व्यापक व तात्त्विक दृष्टीचा सध्या आपल्यात किती अभाव आहे याचे आणखी एक गंमतीदार उदाहरण सांगतो. माझ्या 'पांढरे ढग' या चार महिन्यापूर्वी प्रसिद्ध झालेल्या कादंबरीवर नुकताच एका वृत्तपत्रांत अभिप्राय आला होता. अर्थात् त्या अभिप्रायाचा निम्मा अधिक भाग कथानकाच्या सारांशानें व्यापला होता हें सांगायला नकोच. त्या कादंबरींतली स्वप्नाळु वृत्तीची नायिका लता आपल्या कथालेखनांतून दलितांविषयीं जिव्हाळा दाखवीत असते. पण श्रीमंतीचा आणि

विलासी जीवनाचा मोह सोडवत नसल्यामुळें शेवटीं ती सिनेमा नटी होते, असें मी दाखविलें आहे. सदरहू अभिप्रायकारांनी लता अगदीं सत्यसृष्टीतली वाटते असा शेरा मारून पुढें मल्लीनाथी केली आहे, 'सिनेमांतल्या अनुभवांचें असें चित्र रेखाटून खांडेकर त्याच धंद्यावर आपला चरितार्थ चालवितात ही मोठ्या आश्चर्याची गोष्ट आहे !' या सद्‌गृहस्थांचीं वाङ्मय व जीवन यांच्या संबंधाविषयीं काय मतें आहेत, हें कळायला कांहीं मार्ग नाहीं. कदाचित् त्या बाबतींत विचार करायला त्याना आतांपर्यंत वेळच मिळाला नसेल ! त्यांनी माझ्यावर केलेल्या टीकेंत कांहीं अर्थ आहे असें गृहीत धरलें तर उद्यां डॉक्टर असलेल्या मनुष्यानें आपल्याकडे येणाऱ्या रोग्यांच्या अनुभवांचें कलात्मक कथेंत रूपांतर करणें मोठें पाप ठरेल. हे परीक्षक त्या डॉक्टराला सांगतील, 'आपला धंदा तरी सोडा, नाहीं तर स्वतःच्या अनुभवा-विषयीं लिखाण करायचें तरी सोडा !' डॉक्टर असल्यामुळेंच ब्रिओ 'Damaged Goods' सारखें प्रभावी प्रचार करणारें नाटक लिहूं शकला किंवा क्रोनिन 'Citadel' सारखी अगदीं साध्यासुध्या अनुभवांनीं भरलेली पण अत्यंत हृदयस्पर्शी कादंबरी निर्माण करूं शकला. पण याचा आपल्याकडे पत्ता आहे कुणाला ?

स्वतंत्र टीकाग्रंथ तर क्वचितच प्रसिद्ध होतात. हल्लींच प्रकाशित झालेल्या असल्या पुस्तकांतलीं 'प्रो. फडके-व्यक्ति व वाङ्मय' आणि 'स्वभाव-लेखन' हीं दोन पुस्तकें घेऊं. या दोन लेखकांनीं आपआपल्या पुस्तकाच्या बाबतींत केलेले परिश्रम निःसंशय प्रशंसनीय आहेत. पण व्यक्तिनिष्ठ अनुभवाना दिलेलें सिद्धांतांचें स्वरूप, ऐतिहासिक दृष्टिकोनाचा अभाव, वाङ्मयनिर्मितीच्या क्रियेशीं असणारा अतिशय अपुरा परिचय, इत्यादि अनेक वैगुण्यें या टीकालेखकांच्या ठिकाणीं असल्यामुळें त्यांचें लिखाण बरेंच सदोष झालें आहे. डॉ. सहस्रबुद्धे यांनीं गॉल्सवर्दीच्या जोडीनें हार्डी आणि इब्सेन चाळला असता किंवा प्रो. मा. का. देशपांडे यांनीं फडक्यांना अनेक युरोपियन कादंबरीकारांहून श्रेष्ठ ठरवितांना शरच्चंद्राच्या पांच सहा प्रमुख कादंबऱ्या वाचल्या असत्या, तर आपल्या हस्त-लिखितांतला बराचसा मजकूर तांबड्या शाईनें खोडून टाकणें आवश्यक आहे, एवढी जाणीव त्यांना खास झाली असती !

गांवाला जशी म्युनिसिपालिटीची तशी वाङ्मयाला टीकेची जरूरी असते असें मला वाटतें. पण सध्यांच्या मराठी वाङ्मयाकडे पाहिलें तर त्याच्या म्युनिसिपालिटींतले अनेक सन्मान्य सभासद सभांना नेहमी हजर राहत नाहींत. जे हजर राहातात ते एवढ्यातेवढ्याशा कारणानें वर्दळीवर येतात, आणि रस्ते दुरुस्त करण्यापेक्षां त्यांना आपलीं अगर आपल्या दोस्तांचीं नांवें कशीं दिलीं जातील या विवंचनेंतच कित्येक असतात, असें दिसून येईल. सूक्ष्म रसग्रहण, मुलगामी चिकित्सा, शास्त्रीय दृष्टिकोनानें केलेलें विवेचन इत्यादि गुणांची मध्याच्या टीकालेखनांत दिसून येणारी उणीव वाङ्मयाची वाढ अडवून ठेवीत आहे. चांगलें काय नि वाईट काय, एका कलाकृतीचें सौंदर्य कशांत आहे नि दुसरीचा सामान्यपणा कशामुळें निर्माण झाला आहे हे वाचकाला कळल्याशिवाय, वाङ्मयाचें सौंदर्य पाहण्याची त्याची दृष्टि अधिक सूक्ष्म आणि अधिक विचारशील केल्याशिवाय त्याच्या वाङ्मयीन अपेक्षा मोठ्या होणार नाहीत. आणि जोंपर्यंत वाचकांच्या अपेक्षा या रीतीनें वाढत नाहींत तोंपर्यंत उच्च दर्जाचें वाङ्मय विपुल प्रमाणांत निर्माण होणें आणि जें निर्माण होईल त्याचा यथायोग्य सत्कार होणें या दोन्ही गोष्टी सत्यसृष्टींत उतरत नाहींत. गेल्या एकदोन वर्षांत मराठींत निर्माण झालेलीं कांहीं कांहीं चांगलीं पुस्तकें उपेक्षित स्थितींत मागें पडलीं याचें दुसरें कारण काय असूं शकेल ? कवितेच्या ओहोटीच्या काळांत बोरकरांनीं रसिकांना 'जीवनसंगीत' ऐकविलें. पण श्रोत्यांची वाहवा त्यांना जशी मिळावी तशी मिळाली नाहीं. फारतर 'गाणं गोड आहे !' असे उद्गार चारचौघांनीं काढले असतील. काव्याकडून कथेकडे वळलें तर 'दृष्टीआडच्या सृष्टींत' या शब्दचित्रांच्या सुंदर संग्रहाचेंहि व्हावें तितकें कौतुक झालें नाहीं, असेंच दिसून येईल. या शब्दचित्रांतल्या रेखांत आणि रंगांत नावीन्य, सजीवता आणि कला यांचा सुंदर संगम झाला होता. पण—

चांगल्या वाङ्मयाची अशी उपेक्षा होणें साहित्याच्या प्रगतीच्या दृष्टीनें अत्यंत अनिष्ट आहे. ही उपेक्षा थांबविण्याचा मार्ग एकच आहे. माडखोलकर, फडके, वरेरकर, अत्रे, प्रभृति नामांकित साहित्यिकांनी अभिजात अभिरुचि निर्माण करण्याकरतां टीका—लेखनाकडे वळणें आणि उदयोन्मुख लेखकांनीं अंध अनुकरणामुळें सुसाध्य वाटणाऱ्या लघुकथा—लघुनिबंधादि

कलात्मक लिखाणाचा मोह आवरून प्रथम परिश्रमपूर्वक टीकाकार होणें. चांगला लेखक होऊं इच्छिणारानें आधीं चांगला टीकाकार झालें पाहिजे. सी. के. नायडू हल्लीं हल्लीं चांगलें बोलिंग टाकूं शकतात पण हा गुण खेळाडू या नात्यानें अनेक बोलर्सना तोंड देतां देतां त्यांनीं साध्य केला आहे असें मला वाटतें. टीकाकारहि असाच वाङ्मयनिर्माता होऊं शकतो.

टीकाकार होणें ज्या लेखकाना कमीपणाचें वाटतें त्याना टीकेच्या कक्षेंत येणाऱ्या विविध क्षेत्रांची व त्यांतल्या अगणित बौद्धिक विलासांची कल्पनाच नाहीं, असे म्हणावें लागेल. लेखकाला लेखनाची स्फूर्ति कशी होते, ललित-वाङ्मयांत कल्पना आणि अनुभव यांचें प्रमाण कोणत्या प्रमाणांत असावें, लेखनकला आणि जीवनानुभूति यांच्या संगमाची जागा कोणती इत्यादि प्रश्नांची चर्चा केवळ रुक्षपणानें झाली तर तिच्याकडे फारच थोडे लोक लक्ष देतील. पण गेल्या चाळीस वर्षांत मद्यपान—निषेध या एकाच विषयावर 'मूकनायक', 'विद्याहरण', 'एकच प्याला', 'ब्रँडीची बाटली' आणि 'पेटतें पाणी' या ज्या पाच नामांकित लेखकांच्या पांच विविध कलाकृती निर्माण झाल्या त्यांची सर्वांगीण तुलना केली तर ती जेवढी वाङ्मयदृष्ट्या मनोरंजक होईल तेवढीच सामाजिक दृष्टीनेंहि उद्बोधक ठरेल. प्रत्येक लेखकाच्या कृतीवर परिस्थिति, व्यक्तित्व, कलाकृतीचें माध्यम आणि लोकांची अभिरुचि यांचे विविध परिणाम होऊन तिचें एक नवें पृथगात्म स्वरूप निर्माण होतें. त्या स्वरूपाची यथार्थ कल्पना सर्व सामान्य रसिकतेला निःसंशय वरच्या पातळीवर नेऊं शकेल.

ज्याच्याकडे कुणी सहसा वळत नाहीं असें टीकेचें आणखी एक क्षेत्र जातां जातां सुचवितों. वामनराव जोश्यांच्या लिखाणावरून ते काव्य न लिहिणारे कवि आहेत, गुदगुल्या न करणारे विनोदी लेखक आहेत, विचारवंत तत्त्वज्ञ आहेत, निराशेच्या पार्श्वभूमीवर उभे राहिलेले जीवनाचे आशावादी भाष्यकार आहेत, इत्यादि गोष्टी सहज दिसून येतात. त्यांच्यासारख्या प्रामाणिक साहित्यिकाचें जीवन आणि लेखन हीं किती प्रमाणांत एकमेकांचीं प्रतिबिंबें आहेत हें पाहणें अतिशय महत्त्वाचें आहे. अशा प्रकारच्या टीका—लेखनाला फार खोल अभ्यास लागतो हें मी मान्य करतों. पण समुद्रांत काय अथवा वाङ्मयांत काय, पाणबुड्यालाच मोतीं मिळतात. पृष्ठभागावर तरंगणाराला तीं कधींच लाभत नाहींत.

टीकाकार हा वाङ्मयांतला कुशल वैद्य आहे. जेथें वैद्य दुर्मिळ असतात तेथें वैदूचें फावतें, हा नित्याचा अनुभव आहे. मराठी वाङ्मयांतल्या सध्यांच्या विविध विकृती कमी व्हाव्यात आणि त्याची प्रकृति अधिकाधिक सुदृढ होत जावी म्हणून आज तज्ज्ञ वैद्यांची किती आवश्यकता आहे, याविषयीं मी आतांपर्यंत एवढा प्रपंच केला. पण कुणाचीहि प्रकृति बरी होते ती कांहीं केवळ वैद्याच्या ज्ञानामुळें नाहीं. विकृति झालेल्या माणसाच्या अंगांत रोगाशीं झगडण्याची आणि जिवंत रहाण्याची जी नैसर्गिक शक्ति असते तिला वैद्य साहाय्य करूं शकेल; पण ती शक्ति कांहीं केल्या तो निर्माण करूं शकणार नाहीं.

अशी जीवनशक्ति आजच्या मराठी वाङ्मयात आहे काय म्हणून कुणी मला विचारलें तर मी अभिमानानें त्याला उत्तर देईन, 'असला प्रश्न विचारण्याइतकें आजचें मराठी वाङ्मय दुबळें नाहीं!' कल्पकता, सहृदयता, कला, विनोद, तंत्र, शैली इत्यादि विविध वाङ्मगुणांपैकीं या नाहीं त्या गुणांत ज्याना पहिला वर्ग देता येईल अशा श्रेष्ठ साहित्यिकाची परंपरा चिपळूणकर-आगरकरापासून अत्रे-फडक्यांपर्यंत अखंड सुरू आहे. ही उज्वल परंपरा चालविण्याचें सामर्थ्य असलेले अनेक प्रतिभावान लेखक नवीन पिढींतून उदयाला येत आहेत ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे.

असें असूनहि आजच्या मराठी वाङ्मयांतल्या दोन मोठ्या वैगुण्यांची टोंचणी मी कधींच विसरूं शकत नाहीं. त्यांतलें पहिलें म्हणजे ललित लेखक जें जीवन चित्रित करतात त्याचा संकुचितपणा आणि उथळपणा. वैयक्तिक जीवनाच्या चित्रणाकडे पाहिलें तर मध्यम वर्गांतल्या कॉलेजमध्यें जाणाऱ्या मुला-मुलींपासून वैवाहिक अथवा विवाहबाह्य प्रेम करणाऱ्या स्त्रीपुरुषांपर्यंतचें जीवनच -आणि तेंहि वरवरचें—आमचे प्रथितयश लेखक पाहूं शकतात असें दिसतें. गेल्या दहा वर्षांतलीं निवडक शंभर पुस्तकें काढून तीं जर फार दिवसांनीं परदेशाहून परत येणाऱ्या एखाद्या मराठी गृहस्थाला दिलीं तर महाराष्ट्रात मुलें आणि म्हातारीं माणसें फार कमी झालीं असलीं पाहिजेत, असा त्याचा ग्रह झाल्यावांचून राहणार नाहीं. पंधरा वर्षांचा मुलगा घेतला काय अथवा पन्नास वर्षांचा म्हातारा घेतला काय, अल्लड मुलगी असो किंवा पोक्त आजीबाई असो, आयुष्य हरघडी प्रत्येकापुढें नवनवीं प्रश्नचिन्हें टाकीतच असतें. निर-

निराळ्या वयांतले अनुभव, सुखदुःखें, आशा, आकांक्षा, आणि जीवनाकडे पाहण्याचे दृष्टिकोन, यांच्यांत इतकें अंतर असतें की, पाळण्यांतल्या चिमण्यांशीं खेळणाऱ्या तान्हुल्यापासून तों आपल्या प्राणज्योतीप्रमाणें मंद झालेल्या उशाजवळच्या समईकडे निस्तेज नेत्रांनीं पाहणाऱ्या वृद्धापर्यंतचें मानवी मन चित्रित करतां आल्याशिवाय लेखकाच्या कलेचा खरा विकास झाला असें आपल्याला कधींहि म्हणतां येणार नाहीं.

सामाजिक जीवनाच्या चित्रणांतहि हाच संकुचितपणा अजून दिसून येतो. मध्यम किंवा उच्च दर्जाच्या पांढरपेशा वर्गाबाहेरचें जिवंत चित्रण मराठी वाङ्मयांत अतिशय थोडें आहे. अलीकडे लोकाग्रहास्तव आम्ही लेखक मजूर–शेतकऱ्यांकडे धाव घेऊं लागलों आहों, कथा कादंबऱ्यांत समाजवादावर व्याख्यानेंहि देऊं लागलों आहों, कादंबरीचा गुलाबी रंग बिघडूं नये अशा बेतानें तिच्यांत लाठीमारहि घालीत आहों. पण या चित्रणांत समुद्राच्या लाटांचा जिवंत खळखळाट नाहीं, तळ्यांतल्या पाण्याची मंद कुजबुज आहे. ज्या सामाजिक दुःखानें लेखकाच्या डोळ्यांत अश्रू उभे राहत नाहींत आणि तें दूर करता करता त्या अश्रूंच्या पाठोपाठ जेथें त्वेषयुक्त ठिणग्या चमकूं लागत नाहींत, तें दुःख वाचकांच्या हृदयापर्यंत नेऊन पोंच-विण्यांत त्याला पूर्ण यश मिळणें फार कठिण आहे. बाहेरच्या आघातांनीं लेखकाच्या प्रतिभेच्या ज्या तारा कंप पावतात त्यांचेच मधुर प्रतिध्वनि त्याच्या लिखाणांतून ऐकूं येतात. त्या दृष्टीने लेखकानें आपल्या भावनात्मक व चिंतनात्मक अनुभवाबाहेरचें क्षेत्र चित्रणाकरिता निवडणें कलेच्या दृष्टीनें हानिकारक होतें असेच म्हणावें लागेल.

न पाहिलेल्या, बुद्धीला न पटलेल्या किंवा अंतःकरणानें न आकळलेल्या जीवनाचें कृत्रिम निर्जीव चित्रण हा मराठी वाङ्मयांत विपुलतेनें शिरूं पाहत असलेला जसा एक दोष आहे,त्याप्रमाणें न पटलेल्या तत्त्वाचें गडबडगुंडा करून केलेलें मंडन हाहि एक आमच्या सध्याच्या ललित वाङ्मयाचा महत्त्वाचा अवगुण आहे. फडके व अत्रे या आजकालच्या कादंबरी आणि नाट्य या क्षेत्रांत अग्रेसर मानल्या जाणाऱ्या साहित्यिकाच्या 'उद्धार' व 'लग्नाची बेडी' या लोकप्रिय कृतीच आपण ओझरत्या चिकित्सेकरिता घेऊं. 'उद्धार'मध्यें केवळ आर्थिक स्वातंत्र्यानें स्त्री खरीखुरी स्वतंत्र होत नाहीं, नैतिक स्वातंत्र्य हेंच

स्त्रीचें न्वरं स्वातंत्र्य होय, हे अट्टाहासानें प्रतिपादन करण्याचा फडक्यांनी प्रयत्न केला आहे. कादंबरींतली तात्त्विक चर्चा म्हणजे कलेने परिधान केलेल्या सुंदर पातळाला पडलेल्या वेड्यावाकड्या सुरकुत्या असें ज्याचें एकेकाळीं मत होतें, त्याच फडक्यांनीं या कादंबरींत स्त्रीच्या नैतिक स्वातंत्र्यावर व्याख्यानें झोडायला मुळींच कमी केलेलें नाहीं. पण कलेच्या बाबतींत त्यांनीं फिरविलेल्या पगडीचा प्रश्न बाजूला ठेवला तरी कुमारिकेच्या मातृपदाचें समर्थन करता करता ती कुमारी खरीखुरी माता होत असली तरच या प्रश्नाची तीव्रता वाचकाला जाणवूं शकेल ही गोष्ट ते अजिबात विसरून गेले. स्वप्नांतली कुठलीहि गोष्ट खरी मानण्याइतकी विश्वेसारख्या एकाद्या मुलीच्या मनाची ठेवण विलक्षण असेल, त्यामुळें स्वप्नात विनयकुमार जवळ आल्याचा तिला भास झाला असेल, आपण गरोदर आहों अशी तिला झालेली भावनाहि अपवाद म्हणून का होईना—वैद्यकशास्त्राच्या अनुभवाशीं जुळत असेल. पण जोंपर्यंत कादंबरींतली नायिका कुमारीमाता होऊन पिसाळलेल्या समाजांच्या अमानुष छळाला तोंड द्यायला तयार होत नाहीं, तोंपर्यंत तिला पुढें करून केलेली स्त्रीच्या नैतिक स्वातंत्र्याची वकिली वाचकांना पोकळ वाटल्यावांचून राहणार नाहीं.

अत्र्यांच्या 'लग्नाच्या बेडी'तहि हीच गंमत दृष्टोत्पत्तीला येते. अत्र्यांच्या विनोदी प्रतिभेचें एक गुटगुटीत अपत्य या दृष्टीनें हें नाटक ठीक आहे. पण त्यातलें तत्त्वप्रतिपादन? आर्यमदिरामंडळांतल्या जनूभाऊनें मन्याबापूची बाजू घ्यावी अशांतला प्रकार वाटतो तो. या नाटकांतली सिनेमा नटी रश्मि प्रत्येक बायकोनें तिकडची स्वारी ताब्यात ठेवण्यासाठीं स्वतःच्या शृंगाराची काळजी घेतली पाहिजे असें भरतवाक्य म्हणून हें नाटक संपविते एका सिनेमा नटीचा सार्वजनिक मुखवटा या दृष्टीनें या उपदेशात आक्षेप घेण्यासारखें कांहींच नाहीं. पण या नाटकातला डॉक्टर कांचन यामिनीला सोडून रश्मीच्या नादीं लागतो याचें कारण तिच्यांतला शृंगाराचा अभाव हेंच आहे हें कांहीं केल्या प्रेक्षकाच्या मनाला पटत नाहीं. नाटकाच्या आरंभीं यामिनीचें लग्न होऊन कांहीं दहावीस वर्षें झालीं नव्हतीं किंवा तिला पांचदहा मुलें होऊन ती म्हातारीहि दिसूं लागली नव्हती. लग्नाच्या पहिल्याच वाढदिवशीं तिचे पतिराज एका नाटकी अप्सरेला घरांत

आणून तिच्याभोंवतीं पिंगा घालू लागतात, यांत तिचा विचारीचा काय अपराध आहे ? पण ननगेबाच्या या मानसिक विकृतीवर अत्रे जें रामबाण औषध शोधून काढतात तें कोणतें ? तर कुठल्याहि नायकीने केव्हांहि आपल्या शृंगारात तिळहि उणा पडूं देऊं नये हें ! जणू कांहीं यामिनी चोवीस तास जुनेर नेसूनच घरांत फिरत असल्यामुळें तिच्या सौंदर्यलोलुप नवऱ्याचें डोकें फिरून तो रश्मीच्या मागें धांवत सुटला होता !

आजच्या लोकप्रिय गणल्या जाणाऱ्या सर्व साहित्यिकांच्या विशिष्ट वाङ्मयगुणाचा मी चाहता आहे. मात्र त्या गुणांची परिपूर्ण कल्पना असल्यामुळेंच की काय मला त्यांचे दोष विशेषतः वैचारिक उथळपणांतून आणि जीवनपराङ्मुख अशा वृत्तींतून उद्भवणारे दोष—फार तीव्रतेने जाणवतात. या साहित्यिकांच्या कृती वाचतांना अथवा पाहताना बुद्धि बळाचा सुंदर डाव पाहिल्याचें समाधान मला अनेकदां मिळतें. पण आत्म-विकासाला परिपोषक होणाऱ्या मोहक किंवा दाहक अनुभूतींचा अलौकिक प्रत्यय मात्र त्यांच्या बौद्धिक क्रीडेपासून वाचक या नात्यानें मला सहसा लाभत नाहीं. न पटलेल्या तत्त्वाचें मंडन हें आजचें आमच्या वाङ्-मयाचें फार मोठें वैगुण्य आहे असे मी म्हणतों तें याच कारणामुळें.

व्यक्ति घ्या अगर कलाकृति घ्या, दोन्हींतहि शरीरापेक्षां आत्म्याचें महत्त्व मी शतपटींनीं अधिक मानतों. कुरूप बहिरंग पुरवलें, पण निर्जीव अथवा विकृत अंतरंग नको, हा या बाबतींतला माझा आवडता दंडक आहे. त्यामुळें आजच्या मराठी वाङ्मयांत तंत्र, भाषाशैली, विविध शास्त्रांच्या परिचयानें लेखनाला येणारा सुसंस्कृतपणा, नव्या जीवनाविषयक दृष्टिकोनानें येणारी उदात्तता, इत्यादि गुणांची जी थोडीफार उणीव आढळते, तिच्याविषयीं मला फारसा विषाद वाटत नाहीं. मला दुःख होतें तें वाङ्मयाच्या अंतरंगाच्या उथळपणाविषयीं, त्याच्या निर्जीव कृत्रिमतेविषयीं. वाचकाना काय आवडेल, जें आवडेल तें कोणत्या रंगीत वेष्टनांत गुंडाळून दिलें म्हणजे अधिक आकर्षक होईल,त्याना कुठली भूल दिली असतां आपल्या दोषाकडे त्यांचें लक्ष जाणार नाहीं, हे सारे आडाखे अजमावून केलें जाणारें जीवनचित्रण कितीसें वास्तव, सजीव अथवा उत्कट असणार ? त्याचें नकली सौंदर्य कुणाच्या हृदयाची पकड घेणार ? आत्मानुभूतीच्या प्रामाणिक आविष्कारापासून

आजचे मोठमोठे लेखक दूर दूर जाऊ लागले तर पुढल्या पिढीच्या वाङ्मयावर आणि पर्यायानें तिच्या जीवनावरहि या दोषाचा परिणाम होण्याचा संभव नाही का? म्हणूनच मी सर्व रसिकांचे लक्ष आग्रहानें या गोष्टीकडे वेधून घेत आहें. लग्न ही शृंखला आहे कीं पुष्पमाला आहे आणि ती शृंखला असली तरी ती तोडून टाकावी किंवा नाहीं याविषयीं अत्र्यांनीं आपलं अनुभवजन्य निश्चित मत नाटकांत प्रतिपादन करूं नये असें कुणीच म्हणणार नाहीं. पण रंजनाकरतां विविध स्त्रीपुरुषांच्या चंचल मनाचें आणि स्वैर वर्तनाचें ढंगदार चित्रण करून समाजाच्या तोंडाला पानें पुसण्याकरतां शेवटीं मात्र लग्नाची बेडी आवश्यक आहे असा मोळसूद उपदेश एखाद्या पात्राच्या तोंडी त्यांनी दडपला तर तो कुणाला खरा वाटेल? दारूच्या प्याल्यांत पळीभर तीर्थ टाकून तो पवित्र करून पिण्यातलाच प्रकार आहे हा! केवळ कलादृष्टीनें पाहिलें तरी विडंबनाच्या सीमेवर स्वच्छंदानें बागडणाऱ्या विनोदी कथानकाला असलें तत्त्वज्ञान चिकटविणें म्हणजे चेहऱ्याची रंगरंगोटी करण्यांत तब्बल तीन तास खर्च करणाऱ्या एखाद्या सुंदर तरुणीवर बुरखा घेऊन घराबाहेर पडण्याची सक्ति करण्यासारखेंच नाही का?

'उद्धार' मध्यें फडक्यांना स्त्रियांविषयींची वाचकांची सहानुभूति कायम ठेवूनहि कौमार्यावस्थेंत प्राप्त होणाऱ्या मातृपदाचा प्रश्न प्रामाणिकपणानें रंगविता आला नसता काय? पण—

हा पण पदोपदी पुढें उभा राहत आहे म्हणूनच आज रसिक आणि चिकित्सक टीकाकारांची मराठी साहित्याला फार मोठी गरज आहे असें मी म्हणतो. ज्याला दुसरा काहीं धंदा करतां येत नाहीं तो शेवटीं मास्तर होतो अशी शिक्षकांची एक अंशतः सत्य असलेली व्याख्या प्रचलित आहे. ज्याला दुसरें काही लिहितां येत नाहीं तो टीकाकार होतो असें या पद्धतीनें सध्याच्या दहापैकीं आठ टीकाकारांचें तरी वर्णन करतां येईल. असले बेगडी, दुर्बळ टीकाकार आजच्या संक्रमणकाळांतल्या वाङ्मयाला कसलें वळण लावणार? पाताळांत पडलेल्या सगरपुत्रांच्या रक्षेपर्यंत स्वर्गातल्या गंगेला नेणें हें काहीं येरागबाळाचें काम नाहीं. भगीरथाची तपस्याच हें कार्य करूं शकते. सरस आणि प्रेरक (creative)-टीकेच्या बाबतींतहि हाच अनुभव येतो. एकतंत्र राज्यपद्धतीचे दुष्परिणाम टाळण्याकरतां लोकपक्ष जसा संघटित

झाला पाहिजे आणि त्या पक्षाचे पुढारी जसे त्यागी, बहुश्रुत आणि प्रामाणिक हवेत, त्याप्रमाणें कुठल्याहि वाङ्मयाची खरीखुरी प्रगति व्हायची असेल तर सर्वसामान्य वाचक अधिक अधिक रसिक होत गेला पाहिजे आणि आपल्या बौद्धिक गुणांनीं असल्या असंख्य रसिकांचे जे स्वयंभू पुढारी होऊं शकतात अशा लोकांनींच टीकाकाराची भूमिका स्वीकारली पाहिजे. स्टीफान झ्वाइग या विश्वविख्यात ललित लेखकाचें नाव आपणां सर्वांना परिचित असेलच. तो काव्यात्म पण चिकित्सक वृत्तीनें नुसती भावकथाच लिहीत नाहीं. चरित्र, इतिहास, टीका इत्यादि प्रांतांतहि त्याची तीच सौंदर्यनिष्ठा आणि जीवननिष्ठा प्रकर्षानें प्रगट होते. असल्या टीकाकारांचे आदर्श आपण आपल्यापुढें आज ठेवणें जरूर आहे झ्वाइगचीं Three Masters आणि Adepts in self portraiture हीं दोनच पुस्तकें आपल्यातल्या एखाद्या उदयोन्मुख टीकाकारानें अभ्यासिलीं तरी त्याचा दृष्टिकोन विशाल होईल. आपलें टीकालेखन किती सामान्य, संकुचित आणि दुबळें आहे याची जाणीव होऊन तो ईर्येनें टीकाकाराला आवश्यक अशा तपस्येकडे वळेल.

कालिदासापासून तांब्यांपर्यंतच्या अनेक श्रेष्ठ साहित्यिकांचा सहवास ज्या रसिक मालवभूमीला लाभला आहे, ती मराठीच्या या विकासाच्या काळात टीकाक्षेत्रात महत्त्वाचें कार्य करून दाखवील अशी या प्रसंगीं माझ्यासारख्यानें आशा व्यक्त केली तर ती अस्थानीं ठरणार नाहीं अशी माझी खात्री आहे कारण आजचें निमंत्रण स्वीकारल्यानंतर उज्जयिनीला काय बोलावें याचा मी विचार करूं लागलों तेव्हा उज्जयिनीशीं निकट संबंध असलेल्या कालिदासाचे अनेक सुंदर चरण मला आठवूं लागले. त्या सर्वांत माझें मन अधिक वेळ स्थिर झालें तें मेघदूतांतल्या खालील चरणावर—

' याञ्चा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा ।

## देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनें

### वि. स. खांडेकर

१ फुलें आणि दगड (आ. दुसरी) ३
२ घरट्याबाहेर ( ,, ) ३
३ पहिली लाट ( ,, ) ३
४ स्त्री आणि पुरुष ( ,, ) २
५ सूर्यकमळें ( ,, ) २॥
६ कालचीं स्वप्नें ३
७ आजचीं स्वप्नें ३
८ चंदेरी स्वप्नें ३
९ कलिका २।
१० सोनेरी सावल्या २।
११ मृगजळातील कळ्या २॥
१२ सुवर्णकण २।
१३ मंजिऱ्या २।
१४ सायंकाल (आ. दुसरी) २॥
१५ अविनाश ( ,, ,, ) १।।।
१६ मंदाकिनी ( ,, ,, ) १।।।
१७ कल्पकता ३
१८ आगरकर व्यक्ति-विचार ३॥
१९ सहा भाषणें २
२० तीन संमेलनें २॥
२१ फुलें आणि काटे २।
२२ मराठीचा नाट्यसंसार ३॥
२३ हिरवा चांफा (आ. तिसरी) ५
२४ दोन ध्रुव ( ,, ,, ) ५
२५ उल्का ( ,, ,, ) ४॥
२६ पहिलं प्रेम (आ. दुसरी) ३
२७ क्रौंचवध ( ,, ,, ) ५
२८ पांढरे ढग ( ,, ,, ) ४।
२९ जळलेला मोहर ३

### साने गुरुजी

१ पुनर्जन्म (आ. दुसरी) ३
२ आस्तिक ( ,, ,, ) ३
३ संध्या ५
४ ना खंत ना खेद ५
(कृष्णा हठीसिंग)
५ सोन्या मारुति? (आ. दुसरी) २
६ निळा पक्षी (आ. दुसरी) २॥
७ गोड निबंध (भाग १ ला) ३
८ गोड निबंध (भाग २ रा) ३
९ गोड निबंध (भाग ३ रा) ३

### ग. त्र्यं. माडखोलकर

१ अवशेष २
२ व्यक्तिरेखा २।
३ माझी नभोवाणी २
४ नवे संसार ४
५ चंदनवाडी ६॥
६ नागकन्या ३
७ दोन तपें ५

### ना. धों. ताम्हनकर

१ तात्या भा. १ ला (आ दुसरी) ४
२ तात्या भा २ रा. ३
३ निवाडे भा. १ ला २॥
४ निवाडे भा. २ रा २
५ संतु ४
६ चकमकी १॥
७ बच्चा नवरा १॥
८ अनेक आशीर्वाद ३॥
९ दाजी भा १ ला (आ. ति) ३॥
१० बहिणभाऊ ०।।।

### वा. म. जोशी

१ स्मृति-लहरी २
२ विचार लहरी २
३ विचार-विहार ४।

# देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनें

# देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनें

### र. गो. सरदेसाई

१ चलतीं नाणीं — २

### संपादक आचार्य भागवत

१ वर्धा शिक्षण योजना — ४।

### ग. श्री. जोग

१ सौन्दर्यशोध आणि आनंदबोध — ८

### वि. त्रिं. वाकील

१ बेबीची बहीण — ३

### सत्याग्रही

१ ग्रह आणि तारे — ४॥

### वि. म. भुस्कुटे

१ स्टॅलिन — ३॥
१ आई (मॅक्झिम गॉर्की) — ७

### कमलाबाई टिळक

१ आकाशगंगा — २॥
रामतनय : १ साखरगोटा — ५

### ह. रा. महाजनी

१ आपलें आर्थिक नियोजन — ५
पं. क्षमा राव : १ दणगी — २॥

### गोपीनाथ तळवलकर

१ मंगलधाम — ३॥

### कृ. गो. किनरे

१ प्रकृति दर्शन — ५

### प्रो. हॅरॉल्ड लास्की

१ राज्यशास्त्रप्रवेश — २

### बाबूराव गोखले

१ वारा फोफावला — ३

### प्रो. एम्. एल्. दांतवाला

१ आपली राहणी — १॥।

### बापू गोखले

निवड — १

### अरविंद गोखले

१ उन्मेष — २॥

### रमातनय

१ समाजजीवन — ५

### बिवलकर

१ नाना पाटिल चरित्र — १

### एस. एन्. आग्रवाल

१ विद्यार्थ्यांसाठीं विधायक कार्यक्रम १

### कुसुमावती देशपांडे

१ मोळी — २॥

### सौ. मालतीबाई दांडेकर

१ वज्रलेख — ४॥

### पट्टाभि सीतारामय्या

१ गांधी आणि गांधीवाद — ४

### वियोगहरी

१ अंतरींचे बोल — २॥

### नेताजी सुभाषचंद्र बोस

१ लाल किल्ला — ८